# मंगलाचरण

यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययम
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ॥१॥

गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्याहि शांकरी ।
जयत्याज्ञानमस्तस्यै दयार्द्रायै निरंतरम ॥२॥

सार्द्ध केन च कस्यार्द्ध शिवयो समरूपिणो: ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमितिद्वैतच्छलान्मुहु: ॥३॥

अद्वैतमात्मनस्तत्त्वंदर्शयंतौ मिथस्तराम ।
तौ वंदे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ॥४॥

मूलायाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये ।
क्षीणाग्रमूलमध्याय नम: पूर्णाय शंभवे ॥५॥

# शिवशक्तिसमावेशन

ऐसी इयें निरुपधिकें । जगाचीं जियें जनकें ।
तियें वंदिलीं मियां मूळिकें देवोदेवी ॥१।

जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचे सरोभरी ।
चारुस्थळी येकाहारी । एकांगाची ॥२ ॥

आवडिचेनी वेगें । येकयेकातें गिळिती अंगे ।
कीं द्वैताचेनि पांगे । उगाळिते आहाती ॥३॥

जें येकचि नव्हे येकसरें । दोघां दोनीपण नाहीं पुरें ।
काइ नेणों साकारें । स्वरूपें जियें ॥४॥

कैसी स्वसुखाची आळुकी । जे दोनीपण मिळोनि येकीं ।
नेदितीचि कवतिकीं । एकपण फुटों ॥५॥

हा ठाववरी वियोगभेडें । जे बाळ जगायेव्हढें ।
वियाली परी न मोडे । दोघुलेपण ॥६॥

आपुलिये आंगीं संसारा । देखिलेया चराचरा ।
परी नेदितीचि तिसरा । झोंक लागों ॥७॥

जया येक सत्तेचें बैसणें । दोघां येका प्रकाशाचें लेणें ।
जें अनादि येकपणें । नांदती दोघें ॥८॥

भेदु लाजौनि आवडी । येकरसीं देत बुडी ।
जो भोगणया ठव काढी । द्वैताचा जेथें ॥९॥

जेणें देवें संपूर्ण देवी । जियेविण कांहीं ना तो गोसावी ।
किंबहुना येकोपजीवी । येकयेकांची ॥१०॥

कैसा मेळु आला गोडिये । दोघें न माती जगीं इये ।
कीं परमाणुही माजीं उवायें । मांडलीं आहाती ॥११॥

जिहीं येकयेकावीण । न कींजे तृणाचेंही निर्माण ।
जियें दोघें जिऊ प्राण । जियां दोघां ॥१२॥

घरवातें मोटकीं दोघें । जैं गोसावी सेजे रिघे ।
तैं दंपत्यपणें जागे । स्वामिणी जे ॥१३॥

जिया दोघांमाजीं येकादें । विपायें ऽमजलें होय निदे ।
तरी घरवात गिळुनि नुसुधें । कांहीं ना कीं ॥१४॥

दोहों अंगाचिये आटणी । गिंवसित आहाती येकपणीं ।
जाली भेदाचिया वाहाणी । आधाधीं जियें ॥१५॥

विषो येकमेकांचीं जियें । जियें येकमेकांचीं विष इयें ।
जियें हीं दोघें सुखियें । जियें दोघें ॥१६॥

स्त्रीपुरुष नामभेदें । शिवपण येकलें नांदे ।
जग सकळ आधाधें । पणें जिहीं ॥१७॥

दो दांडीं एकि श्रुति । दोहों फुलीं एकी दृति ।
दोहो दिवीं दीप्ती । येकीचि जेवीं ॥१८॥

दो ओठीं येकी गोठी । दो डोळां येकी दिठी ।
तेवीं दोघीं जिहीं सृष्टी । येकीच जेवीं ॥१९॥

दाऊनि दोनीपण । येक रसाचें आरोगण ।
करीत आहे मेहुण । अनादि जें ॥२०॥

जे स्वामिचिया सत्ता । वीण असो नेणें पतिव्रता ।
जियेवीण सर्व कर्ता । काहीं ना जों ॥२१॥

जें कीं भाताराचें दिसणें । भातारुचि जियेचें असणें ।
नेणिजती दोघेंजणें । निवडूं जिये ॥२२॥

गोडी आणि गुळु । कापुरु आणि परिमळु ।
निवडूं जातां पांगुळु । निवाडु होये ॥२३॥

समग्र दीप्ति घेतां । जेविं दीपुचि ये हातां ।
तेविं जियेचिया तत्त्वतां । शिवुचि लाभें ॥२४॥

जैसी सूर्यी मिरवे प्रभा । प्रभे सूर्यत्वचि गाभा ।
तैसी भेद गिळीत शोभा । येकचि जे ॥२५॥

कां बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंब अनुमापक ।
तैसें द्वैतमिसें एक । बरवतसे ॥२६॥

सर्व शून्याचा निष्कर्षु । जिया बाइला केला पुरुषु ।
जेणें दादुलेन सत्ताविशेषु । शक्ती जाली ॥२७॥

जिये प्राणेश्वरीवीण । शिवीहीं शिवपण ।
थारों न शके ते आपण । शिवें घडली ॥२८॥

ऐश्वर्येसी ईश्वरा । जियेचें आंग संसारा ।
आपण होऊन उभारा । आपणचि जे ॥२९॥

पतीचेनि अरूपपणे । लाजोनि आंगाचें मिरवणें ।
केलें जगायेव्हढें लेणें । नामरूपाचें ॥३०॥

ऐक्याचाही दुकाळा । बहुपणाचा सोहळा ॥
जियें सदैवेचिया लिळा । दाखविला ॥३१॥

आंगाचिया आटणिया । कांतु उवाया आणिला जिया ॥
स्वसंकोचें प्रिया । रूढविली जेणें ॥३२॥

जियेतें पाहावयाचिया लोभा । चढे दृष्टुत्वाचिया क्षोभा ।
जियेतें न देखतु उभा । आंगचि सांडी ॥३३॥

कांतेचिया भिडा । अवला होय जगायेव्हढा ।
आंगविला उघडा । जियेविण ॥३४॥

जो हा ठावो मंदरूपें । उवायिलेपणेंचि हारपे ।
तो जाला जियेचेनि पडिपे । विश्वरूप ॥३५॥

जिया चेवविला शिवु । वेद्याचे बोणें बहु ।
वाढितेणेंसि जेऊं । धाला जो ॥३६॥

निदैलेनि भातारें । जे विये चराचरें ।
जियेचा विसांवला नुरे । आंबुलेपणही ॥३७॥

जव कांतु लपो बैसे । तंव नेणिजे जिच्या दोषें ।
जियें दोघें आरिसें । जियां दोघां ॥३८॥

जियेचेनि आंगलगें । आनंद आपणा आरोगूं लागे ।
सर्व भोक्तृत्वही नेघे । जियेविण कांहीं ॥३९॥

जया प्रियाचें जें आंग । जो प्रियुचि जियेचें चांग ।
कालाठनी दोन्ही भाग । जेवितें आहाति ॥४०॥

जैसि कां समिरेंसकट गति । कां सोनियासकट कांति ।
तैसि शिवेसिं शक्ति । अवघिचि जे ॥४१॥

कां कस्तुरीसकट परिमळु । कां उष्मेसकट अनळु ।
तैसा शक्तिसिं केवळु । शिवुचि जो ॥४२॥

राति आणि दिवो । पातली सूर्याचा ठावो ।
तैसीं आपुला साचि वावो । दोघेंही जियें ॥४३॥

किंबहुना तियें । प्रणवाक्षरीं विरुढतियें ।
दशेचीही वैरियें । शिवुशक्ती ॥४४॥

हे असो नामरूपाचा भेदसिरा । गिळित येकार्थाचा उजिरा ।
नमो तया शिववोहरा । ज्ञानदेवु म्हणे ॥४५॥

जया दोघांच्या आलिंगनीं । विरोनि गेली दोन्ही ।
आघवियाची रजनी । दिठीचि जे ॥४६॥

जयांच्या रूपनिर्धारीं । गेली परेसीं वैखरी ।
सिंधूसीं प्रळयनिरीं । गंगा जैशी ॥४७॥

वायु चळबळेंशीं । जिराला व्योमाचिये कुशीं ।
आटला प्रळयप्रकाशीं सप्रभ भानु ॥४८॥

तेवि निहाळिता ययांते । गेले पाहणेंनसीं पाहतें ।
पुढती घरौतेंवरौतें । वंदिलीं तियें ॥४९॥

जयांच्या वाहाणी । वेदकु वेद्याचें पाणी ।
न पिये पण सांडणी । आंगाचि करी ॥५०॥

तेथ मी नमस्करा । लागीं उरों दुसरा ।
तऱ्ही लिंगभेद पऱ्हा । जोडुं जावों ॥५१॥

परि सोनेनसिं दुजें । नव्हतु लेणें सोना भजे ।
हे नमन करणें माझें । तैसें आहे ॥५२॥

सांगतां वाचेतें वाचा । ठाउ वाच्य वाचकाचा ।
पडतां काय भेदाचा । विटाळु होये? ॥५३॥

सिंधु आणि गंगेचि मिळणी । स्त्रीपुरुष नामाची मिरवणी ।
दिसतसे, तरि काय पाणी । द्वैत होईल ? ॥५४॥

पाहे पां भास्य भासकता । आपुला ठाईं दाविता ।
एकपण काय सविता । मोडितसे ? ॥५५॥

चांदाचिया दोंदावरी । होत चांदणियाची विखुरी ।
काइ उणें दीप्तीवरी । गिवसों पां दीपु ॥५६॥

मोतियाची कीळ । होत मोतियावरी पांगुळ ।
आगळें निर्मळ । रूपा येकीं ? ॥५७॥

मात्राचिया त्रिपुटिया । प्रणवु काइ केला चिरटिया ? ।
की `णकार' तिरेघटिया । भेदवला काई ? ॥५८॥

अहो ऐक्याचें मुद्दल न ढळे । आणि साजिरेपणाचा लाभु मिळे ।
तरी स्वतरंगाची मुकुळें तुरंबु कां पाणी !! ॥५९॥

म्हणौनि भूतेशु आणि भवानी । वंदिलीं, न करूनि सिनानीं ।
मी रिघालों नमनीं । तें हें ऐसें ॥६०॥

दर्पणाचेनि त्यागें । प्रतिबिंब बिंबीं रिगे ।
का बुडी दिजे तरंगें । वायुचा ठेला ॥६१॥

नातरी नीदजात खेवों । पावे आपुला ठावो ।
तैशी बुद्धित्यागें देवीदेवो । वंदिलीं मियां ॥६२॥

सांडूनि मीठपणाचा लोभु । मिठें सिंधुत्वाचा घेतला लाभु ।
तेविं अहं देवुनि शंभु । शांभवी झालों ॥६३॥

शिवशक्तिसमवेशें । नमन केलें म्यां ऐसें ।
रंभागर्भ आकाशें । रिगाला जैसा ॥६४॥
॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्मृतानुभवे शिवशक्तिसमावेशनं नाम प्रथम प्रकरणं संपूर्णम् ॥

# श्रीगुरुस्तवन

आता उपायवनवसंतु । जो आज्ञेचा आहेवतंतु ।
अमुर्तेचि परि मूर्तु । कारुण्याचा ॥१॥

अविद्येचे आडवे । भुंजीत जीवपणाचे भवे ।
त्या चैत्य्न्याचे धांवे । कारुण्यें जो कीं ॥२॥

मोडोनि मायाकुंजरू । मुक्तमोतियाचा वोगरू ।
जेवविता सदगुरू । निवृत्ति वंदू ॥३॥

जयाचेनि अपांगपातें । बंध मोक्षपणीं आते ।
भेटे जाणतया जाणते । जयापाशीं ॥४॥

कैवल्यकनकाचिया दाना । जो न कडसी थोर साना ।
द्रष्ट्याचिया दर्शना पाढाऊ जो ॥५॥

सामर्थ्याचेनि बिकें । जो शिवाचेही गुरुत्व जिंके ।
आत्मा आत्मसुख देखे । आरिसा जिये ॥६॥

बोधचंद्रचिया कळा । विखुरलिया येकवळा ।
कृपापुनवलीळा । करी जयाची ॥७॥

जो भेटलियाची सवे । पुरती उपायांचे धांवे ।
प्रवृत्ति-गंगा स्थिरावे । सागरी जिये ॥८॥

जयाचेनि अनवसरें । दृष्टाले दृश्याचे मोहिरें ।
जो भेटतखेंव सरे । बहुरुपचि हें ॥९॥

अविद्येचें काळवखें । कीं स्वबोध सुदिनें फांके ।
सीतलें प्रसादार्के । जयाचेनि ॥१०॥

जयाचेनि कृपासलिलें । जिउ हा ठाववरी पाखाळे ।
जे शिवपणहि वोंविळें । अंगी न लवो ॥११॥

राखों जाता शिष्यातें । गुरुपणहि धाडिलें थितें ।
तऱ्ही गुरुगौरव जयातें । सांडीचिना ॥१२॥

एकपण नव्हे सुसास । म्हणोन गुरुशिष्यांचें करोनि मिस ।
पाहणेंचि आपली वास । पाहतसे ॥१३॥

जयाचेनि कृपातुषारें । परतलें अविद्येचें मोहिरें ।
परिणमे अपारें । बोधामृते ॥१४॥

वेद्या देतां मिठी । वेदकुहि सुये पोटीं ।
तऱ्ही नव्हेचि उशिटी । दिठी जयाची ॥१५॥

जयाचेनि सावायें । जीवु ब्रह्म उपर लाहे ।
ब्रह्म तृणातळीं जाये । उदासें जेणें ॥१६॥

उपस्तिवरि राबतिया । उपाय फळीं येती मोडोनियां ।
वरिवंडले जयाचिया । अनुज्ञा कां ॥१७॥

जयाचा दिठिवावसंतु । जव न रिघे निगमवनाआंतु ।
तंव आपुलिये फळीं हातु । न घेपतिही ॥१८॥

पुढें दृष्टीचेनि आलगें । खोंचि कीं निवटी मागें ।
येव्हडिया जैता नेघे । आपणपें जो ॥१९॥

लघुत्वाचेनि मुद्दलें । बैसला गुरुत्वाचे शेले ।
नासूनि नाथिलें सदैव जो ॥२०॥

नाहीं ते जळीं बुडिजे । तै घनवटें जेणें तरिजे ।
जेणें तरलियाहि नुरिजे । कवणिये ठाई ॥२१॥

आकाश हे सावेव । न बंधे आकाशाची हांव ।
ऐसे कोण्ही येक भरीव । आकाश जो ॥२३॥

चंद्रादि सुसीतळें । घडलीं जयाचेनि मेळें ।
सूर्य जयाचेनि उजाळें । कडवसोनि ॥२४॥

जीवपणाचेनि त्रासें । यावया आपुलिये दशे ।
शिवही मुहूर्त पुसे । जया जोशियातें ॥२५॥

चांदिणें स्वप्रकाशाचें । लेइला द्वैतदुणीचें ।
तरि्हि उघडेपण नवचे । चांदाचें जया ॥२६॥

जो उघडा कीं न दिसे । प्रकाश कीं न प्रकाशे ।
असतेपणेंचि नसे । कव्हणीकडे ॥२७॥

आता जो,तो इहीं शब्दीं । कें मेळऊं अनुमानाची मांदी ।
हा प्रमाणाहि वो नेदी । कोण्हाहि मा ॥२८॥

जेथें शब्दाची लिही पुसे । तेणेंसिं चावळों बैसे ।
दुजयाचा रागीं रुसे । येकपणा जो ॥२९॥

प्रमाणाचि परि सरे । तैं प्रमेयचि आविष्करे ।
नवल मेचुं ये धुरे । नाहींपणाची ॥२९॥

कांहींबाहीं अळुमाळु । देखिजे येखादे वेळु ।
तरी, `देखे' तेहि विटाळु । जया गावा ॥३०॥

तेथें नमनें का बोलें । केउती सुयें पाउलें ।
आंगीं लाउनि नाडिलें । नांवचि येणें ॥३१॥

नव्हे आत्मया आत्मप्रवृत्ति । वाढवितां कें निवृत्ति ? ।
तरी या नामाची वायबुंथी । सांडीचिना ॥३२॥

निवर्त्य तंव नाहीं । मा निवर्तवी हा काई ।
तरि कैसा बैसे ठाईं । निवृत्ति-नामाच्या ? ॥३३॥

सूर्यासि अंधकारु । कैं झाला होता गोचरु ? ।
तऱ्ही तमारि हा डगरु । आलाचि कीं ॥३४॥

लटिकें येणें रूढे । जड येणें उजिवडे ।
न घडे तेंहि घडे । याचिया मावा ॥३५॥

हा गां मायावशें दाविसी । तें मायिक म्हणोन वाळिसी ।
अमायिक तंव नव्हसी । कवणाहि विषो ॥३६॥

शिवा शिवा सदगुरु । तुजला गूढा काय करू ? ।
येकाहि निर्धारा धरूं । देतासि कां ? ॥३७॥

नामें रूपें बहूवसें । उभारूनि पाडिलिं ओसें ।
सत्तेचेनि आवेशें । तोषलासि ना ? ॥३८॥

जिउ घेतलिया उणे । चालों नेदिसी साजणें ।
भृत्यु उरे स्वामीपणें । तेंहि नव्हें ॥३९॥

विशेषाचेनि नांवें । आत्मत्वही न साहावे ।
किंबहुना न व्हावें । कोण्हीच या ॥४०॥

राति नुरेचि सूर्या । नातरी लवण पाणिया ॥
नुरेचि जेवी चेइलिया । नीद जैसी ॥४१॥

कापुराचे थळीव । नुरेचि आगीची बरव ।
नुरेचि रूप नांव । तैसें यया ॥४२॥

याच्या हातांपायां पडे । तरी वंद्यत्वें पुढें न मंडे ।
न पडेचि हा भिडे । भेदाचिये ॥४३॥

आपणाप्रति रवी । उदो न करी जेवीं ।
हा वंद्य न्व्हे तेवीं । वंदनासी ॥४४॥

कां समोरपण आपलें । न लाहिजे कांहीं केलें ।
तैसें वंद्यत्व घातलें । हारौनि येणें ॥४५॥

आकाशाचा आरिसा । नुठे प्रतिबिंबाचा ठसा ।
हा वंद्य नव्हे तैसा । नमस्कारासी ॥४६॥

परी नव्हे तरी नव्हो । हें वेखासें कां घेवो ।
परी वंदीतयाहि ठावो । उरों नेदी ॥४७॥

आंगौनि येकुणा झोळु । फेडितांचि तो तरी बाहिरिळू ।
कडु फिटे आतुलु । न फेडिताचि ॥४८॥

नाना बिंबपणासरिसें । घेऊनि प्रतिबिंब नासें ।
नेले वंद्यत्व येणें तैसें । वंदितेंनसीं ॥४९॥

नाहीं रूपाचि जेथें सोये । तेथें दृष्टीचें काहींचि नव्हे ।
आम्हां फळले हे पाये । ऐसिया दशा ॥५०॥

गुणातेलाचिया सोयरिका । निर्वाहिलई दीपकळिका ।
ते का होईल पुळिका । कापुरचिया ॥५१॥

तया दोहों परस्परें । होय ना जंव मेळहैरें ।
तंव दोहीचेंही सरें । सरिसेंचि ॥५२॥

तेविं देखेना यीययातें । तंव गेलें वंद्य वंदितें ।
चेइलिया कांतें । स्वप्नींचें जेवीं ॥५३॥

किंबहुना इया भाखा । द्वैताचा जेथें उपखा ।
फेडोनियां स्वसखा । श्रीगुरु वंदिला ॥५४॥

याच्या सख्याची नवाई । आंगी एकपण रूप नाही ।
आणि गुरु-शिष्य दुवाळीही । पवाडु केला ॥५५॥

कैसा आपणया आपण । दोंविण सोइरेपण ।
हा याहुनि विलक्षण । नाहींना नोहे ॥५६॥

जग आघवे पोटी माये । गगनायेव्हढे हो उनि ठाये ।
तेचि निशी साहे । नाहीपणाची ॥५७॥

कां पूर्णते तरि आधारु । सिंधु जैसा दुर्भरु ।
तैसा विरुद्धेयां पाहुणेरु । याच्या घरीं ॥५८॥

तेजा तमातें कांहीं । परस्परें निकें नाहीं ।
परि सूर्याच्या ठायीं । सूर्यचि असे ॥५९॥

येक म्हाणतां भेदें । तें कीं नानात्वें नांदे ? ।
विरुद्धें आपणया विरुद्धें । होती काइ ? ॥६०॥

म्हणौनि शिष्य आणि गुरुनाथु । या दोहो शब्दांचा अर्थु ।
श्री गुरुचि परी होतु । दोहों ठायीं ॥६१॥

कां सुवर्ण आणि लेणें । वसतें येकें सुवर्णें ।
वसतें चंद्र चांदिणें । चंद्रींचि जेवीं ॥६२॥

नाना कापुरु आणि परिमळु । कापुरुचि केवळु ।
गोडी आणि गुळु । गुळुचि जेवीं ॥६३

तैसा गुरुशिष्यमिसें । हाचि येकु उल्हासे ।
जऱ्ही कांहीं दिसे । दोन्हीप-पणें ॥६४॥

आरिसा आणि मुखीं । मी दिसे हे उखी ।
आपुलिये ओळखी । जाणे मुख ॥६५॥

पहापा निरंजनीं निदेला । तो निर्विवाद येकला ।
परि चेता चेवविता जाहला । दोन्ही तोचि ॥६६॥

जे तोचि चेता तोचि चेववी । तेवीं हाचि बुझे हाचि बुझावी ।
गुरुशिष्यत्व नांदवी । ऐसेन हा ॥६७॥

दर्पणेवीण डोळा । आपुले भेटीचा सोहळा ।
भोगिता तरि लीळा । सांगतों हें ॥६८॥

एवं द्वैतासी उमसो । नेदि ऐक्यासी विसकुसों ।
सोईरिकीचा अतिसो । पोखीतसे ॥६९॥

निवृत्ति जया नांव । निवृत्ति जया बरव ।
जया निवृत्तीची राणीव । निवृत्तिचि ॥७०॥

वांचोनि प्रवृत्तिविरोधें । कां निवृत्तीचेनि बोधें ।
आणिजे तैसा वादें । निवृत्ति नव्हे ॥७१॥

आप्णा देऊनि राती । दिवसा आणी उन्नति ।
प्रवृत्ति वारी निवृत्ति । नव्हे तैसा ॥७२॥

वोपसरयाचे बळ । घेऊनि मिरवे कीळ ।
तैसें रत्न नव्हे निखळ । चक्रवर्ती हा ॥७३॥

गगनही सूनि पोटिं । जै चंद्राची पघळे पुष्टी ।
तैं चांदिणें तेणेंसि उठी । आंग जयाचें ॥७४॥

तैसें निवृत्तिपणासी कारण । हाचि आपणया आपण ।
घेयावया फुलचि झालें घ्राण । आपुली दृती ॥७५॥

दिठी मुखाचिये बरवे । पाठीकडोनि जैं पावे ।
तैं आरिसे धांडोळावे । लागती काई ? ॥७६॥

कीं राती हन गेलिया । दिवस हन पातलिया ।
काय सूर्यपण सूर्या । होआवें लागे ? ॥७७॥

म्हणोनि बोध्य बोधोनि । घेपे प्रमाणें साधोनि ।
ऐसा नव्हे भरंवसेनि । गोसावी हा ॥७८॥

ऐसें करणियावीण । स्वयंभचि जें निवृत्तिपण ।
तयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥७९॥

आता ज्ञानदेवु म्हणे । श्रीगुरु प्रणामें येणें ।
फेडिलीं वाचाऋणें । चौही वाचांची ॥८०॥

॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्‌मृतानुभवे गुरुस्तवनम् नाम द्वितीय प्रकरणं संपूर्णम् ॥

# वाचाऋणपरिहार

ययांचेनि बोभाटे । आत्मयाची झोंप लोटे ।
पूर्ण तऱ्ही ऋण न फिटे । जें चेणोंचि नीद कीं ॥१॥

येऱ्हवीं परादिका चौघी । जीवमोक्षाच्या उपेगीं ।
अविद्येसवें आंगीं । वेंचती कीर ॥२॥

देहासवे हातपाये । जाती, मनासवें इंद्रियें ।
कां सूर्यासवें जाये । किरणजाळ ॥३॥

ना तरी निद्रेचिये अवधी । स्वप्नें मरती आधीं ।
तेवीं अविद्येचे संबंधी । आटती इया ॥४॥

मृतें लोहें होती । ते रसरूपें जिती ।
जळोनि इंधने येती । वन्हिदशे ॥५॥

लवण अंगें विरे । परी स्वादें जळीं उरे ।
नीद मरोनि जागरें । जिइजे निदें ॥६॥

तेवीं अविद्येसवें । चौघीं वेंचती जीवें ।
तत्वज्ञानाचेनि नावें । उठ्तीचि या ॥७॥

हा तत्वज्ञान दिवा । म्रोनि इहीं लावावा ।
तरी हाही शिणलेवा । बोधरूपेंची ॥८॥

येऊनि स्वप्न मेळवी । गेलिया आपणपां दावी ।
दोन्ही दिठी नांदवी । नीद जैशी ॥९॥

जिती अविद्या ऐसी । अन्यथा बोधातें गिंवसी ।
तेचि यथा बोधेंसीं । निमाली उठी ॥१०॥

परि जीती ना मेली । अविद्या हे जाकळी ।
बंधमोक्षीं घाली । बांधोनिया ॥११॥

मोक्षुचि बंधु होये । तरी मोक्ष शब्द कां साहे ? ।
अज्ञान घरी त्राये । वाउगीची ॥१२॥

बगुलाचेनि मरणें । तोषावें कीं बाळपणें ।
येरा तो नाहीं मा कोणें । मृत्यु मानावा ॥१३॥

घटाचें नाहींपण । फुटलियाची नागवण ।
मानीत असे ते जाण । म्हणो ये कीं ॥१४॥

म्हणोनि बंधुचि तंव वावो । मा मोक्षा कें प्रसवो ? ।
मरोनि केला ठावो । अविद्या तया ॥१५॥

आणि ज्ञान, बंधु ऐसें । शिवसूत्राचेनि मिसें ।
म्हणितलें असे । सदाशिवें ॥१६॥

आणि वैकुंठींचेहि सुजाणें । ज्ञानपाशीं सत्वगुणें-।
बांधिजे, हे बोलणें । बहू केलें ॥१७॥

परि शिवें कां श्रीवल्लभें । बोलिलें येणेचि लोभें ।
मानु तेहि लाभे । न बोलतांही ॥१८॥

जें आत्मज्ञान निखळ । तेंहि घे ज्ञानाचें बळ ।
तैं सूर्य चिंती सबळ । तैसे नोव्हे ? ॥१९॥

ज्ञानें श्लाघ्यतु आहे । तैं ज्ञानपण धाडिलें वायें ।
दीपावाचून दिवा [ वस्तु न ] लाहे । तैं आंग भुललाचि किं ॥२०॥

आपणचि आपणापाशीं । नेणतां देशोदेशीं ।
आपणपें गिवशी । हे कीरु होये? ॥२१॥

परि बहुतां कां दिया । आपणापें आठवलिया ।
म्हणे मी यया। कैसा रिझों ॥२२

तैसा ज्ञानरूप आत्मा । ज्ञानेचि आपली प्रभा ।
करितसे सोहं मा । ऐसा बंधू ॥२३॥

जे ज्ञान स्वये बुडे । म्हाणोनि भारी नावडे
ज्ञानें मोक्षु घडे । तें निमालेनी ॥२४॥

म्हणोनि परादिका वाचा । तो शृंगारु चौ अंगांचा ।
एवं अविद्या जीवाचा । जीवत्व त्यागी ॥२५॥

आंगाचेनि इंधनें उदासु । उठोनि ज्ञानाग्नि प्रवेशु ।
करी तेथे भस्मलेशु । बोधाचा उरें ॥२६॥

जळीं जळा वेगळु । कापूर न दिसे अवडळु ।
परि होऊनि परिमळु उरे जेवीं ॥२७॥

अंगी लाविलिया विभूती । तैं परमणुही झडती ।
परि पांडुरत्वें कांती । राहे जैसी ॥२८॥

ना वोहळला आंगी जैसे । पाणीपणें नसें ।
तऱ्ही वोल्हासाचेनि मिसें । आथीच तें ॥२९॥

ना तरी माध्यान्हकाळीं । छाया न दिसें वेगळी ।
असे पायातळीं । रिगोनिया ॥३०॥

तैसें ग्रासुनि दुसरें । स्वरूपीं स्वरूपाकारें ।
आपुलेपणे उरे । बोधु जो कां ॥३१॥

तें ऋणशेष वाचा इया । न फेडवेचि मरोनियां ।
तें पाया पडोनि मिया । सोडविलें ॥३२॥

म्हाणोनि परा पश्यंति । मध्यमा हन भारती ।
या निस्तरलिया लागती ज्ञानीं अज्ञानींची ॥३३॥
॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदमृतानुभवे वाचाऋणपरिहार नाम तृतीय प्रकरणं संपूर्णम् ॥

# ज्ञानाज्ञानभेदकथन

आता अज्ञानाचेनि मारें । ज्ञान अभेदें वावरें ।
नीद साधोनि जागरें । नांदिजे जेवीं ॥१॥

कां दर्पणाचा निघाला । ऐक्यबोधु पहिला ।
मुख भोगी आपुला । आपणचि ॥२॥

ज्ञान जिया तिया परी । जगीं आत्मैक्य करी ।
तैं सुरिया खोचे सुरी । तैसें जालें ॥३॥

लावी आंत ठावूनि कोपट । तो साधी आपणया सकट ।
का बांधलया चोरट । मोटेमाजी ॥४॥

आगी पोतासाचेनि मिसें । आपणपें जाळिलें जैसें ।
ज्ञाना अज्ञान नाशें तैंसें जालें ॥५॥

अज्ञानाचा टेका । नसतांही ज्ञानाधिका ।
फांके तंव उफखा । आपुला पडे ॥६॥

दशाही ते निमालिया । येणें जें उवाया ।
तें केवळ नाशावया । दीपाचे परी ॥७॥

उठणें कीं पडणें । कुचभाराचे कोण जाणे ।
फांकणें कीं सुकणें । जाउळाचें ॥८॥

तरंगाचें रूपा जेणें । तयाचि नांव निमणें ।
कां विजूचें उदैजणें । तोचि अस्तु ॥९॥

तैसें पिऊनि अज्ञान । तंववरी वाढे ज्ञान ॥
जंव आपुलें निधन । निःशेष साधे ॥१०॥

जैसें कल्पान्तीचें भरितें । स्थळाजळा दोहींतें ।
बुडविलिया आरौतें । रहोंचि नेणे ॥११॥

की विश्वाहि वेगळ । वाढे जैं सूर्यमंडळ ।
तैं तेज तम निखळ । तेंचि होय ॥१२॥

नाना नीद मारोनि । आपणपें हिरौनि ।
जागणे ठाके होवोनि । जागणेंचि ॥१३॥

तैसें अज्ञान आटोनियां । ज्ञान येतें उवाया ।
ज्ञानाज्ञान गिळूनिया । ज्ञानचि होय ॥१४॥

ते वेळीं पुनिवां भरे । ना अवसां सरे ।
ते चंद्रींचि उरे । सतरावी जैशी ॥१५॥

कां तेजांतरें नाटोपे । कोण्हे तमें न सिंपे ।
ते उपमेचें जाउपें । सूर्यचि होय ॥१६॥

म्हणोनि ज्ञानें उजळे । कां अज्ञानें रुळे ।
तैसें नव्हे निर्वाळें ज्ञानमात्र जें ॥१७॥

प्री ज्ञानमात्रें निखळें तेंचि कीं तया कळे ! ! ।
काई देखिजे बुबुळें । बुबुळा जेवीं ? ॥१८॥

आकाश आपणया रिगे ? । कायी आगि आपणया लागे ? ।
आपला माथा वोळघे । आपण कोण्ही ? ॥१९॥

दिठि आपाणया देखे ? । स्वादु आपणया चाखे ? ।
नादु आपलें आइके ? नादपण ॥२०॥

सूर्य सूर्यासि विवळे ? । का फळ आपणया फळे ? ।
परिमळु परिमळें घेपतु असे ? ॥२१॥

तैसें आपणयां आपण । जाणतें नव्हे जाण ।
म्हणौनि ज्ञानपणेंवीण । ज्ञानमात्र जें ॥२२॥

आणि ज्ञान ऐसी सोये । ज्ञानपणेंचि जरी साहे ।
तरी अज्ञान हें नोहे ? । ज्ञानपणेचि ॥२३

जैसें तेज जें आहे । तें आंधारें कीर नोहे ।
मा तेज तऱ्ही होये । तेजासी काईं ? ॥२४॥

तैसें असणें आणि नसणें । हें नाहीं जया होणें ।
आता मिथ्या ऐसें येणें । बोलें गमे ॥२५॥

तरी कांहीं नाहीं सर्वथा । ऐसी जरी व्यवस्था ।
तरी नाहीं हे प्रथा । कवणासि पां ? ॥२६॥

शून्यसिध्दांतबोधु । कोणे सत्ता होये सिध्दु ? ।
नसता हा अपवादु । वस्तुसि जो ॥२७॥

माल्हवितां दिवे । माल्हवितें जरी माल्हवे ।
तरी दिपु नाही हे फावे । कोणासि पां ? ॥२८॥

कीं निदेचेनि आलेंपणें । निदेलें तें जाय प्राणें ।
तरी नीद भली हें कोणें । जाणिजेल पां ? ॥२९॥

घटु घटपणें भासें । तद्भंगे भंगू आभासे ।
सर्वथा नाही तैं नसए ॥ कोणे म्हणावें ? ॥३०॥

म्हाणोनि कांही नाहींपण । देखता नाही आपण ।
नोहुनि असणेवीण । असणें जें ॥३१॥

परी आणिका कां आपणया । न पुरे विषो होआवया ।
म्हणोनि न असावया । कारण कीं ! ॥३२॥

जो निरंजनी निदेला । तो आणिकीं नाही देखिला ।
आपुलाही निमाला । आठाउ तया ॥३३॥

परी जिवें नाही नोहे । तैसें शुध्द असणें आहे ॥
हें बोलणें न साहे । असेनाहींचें ॥३४॥

दिठी आपणया मुरडे । तैं दिठीपणहि मोडे ।
परी नाहीं नोहे फुडे । तें जाणेचि ते ॥३५॥

कां काळा राहे काळवखा । तो आपणया ना आणिका ।
न चोजवे तऱ्ही आसिका । हा मी बाणे ॥३६॥

तैसें असणें कां नसणें । हें काहींच मानुसवाणें ।
नसोनि, असणें । ठाये ठावो ॥३७॥

निर्मळपणीं आपुला । आकाशाचा संचु विराला ।
तो स्वयें असे पुढिला । कांहीं ना कीं ॥३८॥

कां आंगी कीं निर्मळपणीं । हारपलिया पोखरणीं ।
हें आणिकावांचूनि पाणी । सगळेंचि आहे ॥३९॥

आपणा भागु तैसें । असणेंचि जे असे ।
आहे नाहीं ऐसें । सांडोनिया ॥४०॥

निदेचें नाहींपण । निमालियाहि जागेंपण ।
असिजे कां नेण । कोणी न होऊनि जैसें ॥४१॥

कां भुमि कुंभ ठेविजे । तै सकुंभता आपजे ।
तो नेलियां म्हणिजे । तेणेंवीण ॥४२॥

परी दोन्ही हे भाग । न शिवति भूमीचें आंग ।
ते वेळीं भूमि तैसें चांग । चोख जें असणें ॥४३॥
॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्मृतानुभवे ज्ञानाज्ञानभेदकथनं नाम चतुर्थ प्रकरणं संपूर्णम् ॥

# सच्चिदानंदपदत्रयविवरण

सत्ता प्रकाश सुख । या तिहीं तीं उणे लेख ।
जैसें विखपणेचि विख । विखा नाही ॥१॥

कांति काठिण्य कनक । तिन्ही मिळोनि कनक एक ।
द्राव गोडी पीयुख । पीयुखचि जेवीं ॥२॥

उजाळ दृति मार्दव । या तिहीं तिहीं उणीव ।
हें देखिजे सावेव । कापुरीं एक ॥३॥

आंगे कीर उजाळ । कीं उजाळ तोचि मवाळ ।
कीं दोन्ही ना परिमळ । मात्र जें ॥४॥

ऐसें एके कापुरपणीं । तिन्ही इये तिन्ही उणी ।
इयापरी आटणी । सत्तादिकांची ॥५॥

येऱ्हवीं सच्चिदानंदभेदें । चालिलीं तिन्ही पदें ।
परि तिन्हीं उणीं आनंदें । केलीं येणें ॥६॥

सत्ताचि कीं सुख प्रकाशु । प्रकाशुचि सत्ता उल्हासु ।
हे न निवडे मिठांशु । अमृतीं जेवीं ॥७॥

शुक्ल पक्षींच्या सोळा । दिवसा वाढती कळा ।
परि चंद्र मात्र सगळा । चंद्रीं जेवीं ॥८॥

थेंबीं पडतां उदक । थेंबीं धरू ये लेख ।
परि पडिला ठायीं उदक । वांचूनि आहे ? ॥९॥

तैसें असताचिया व्यावृत्ती । सत म्हणों आलें श्रुति ।
जडाचिया समाप्ती । चिद्रुप ऐदें ॥१०॥

दु:खाचेनि सर्वनाशें । उरलें तें सुख ऐसें ।
निगदिलें निश्वासें प्रभूचेनि ॥११॥

ऐसीं सदादि प्रतियोगियें । असदादि तिन्ही इयें ।
लोटितां जाली त्राये । सत्तादिकां ( पदां ) ॥१२॥

एवं सच्चिदानंन्दु । आत्मा हा ऐसा शब्दु ।
अन्यनावृत्ति सिद्धु । वाचक नव्हे ॥१३॥

सूर्याचेनि प्रकाशें । जें कांहीं जड आभासें ।
तेणें तो गिंवसें । सूर्यु कायी ? ॥१४॥

तेवीं जेणें तेजें । वाचेसि वाच्य सुजें ।
ते वाचा प्रकाशिजे । हें कें आहे ? ॥१५॥

विषो नाहीं कोण्हाही । जया प्रमेयत्वचि नाहीं ।
तया स्वप्रकाशा काई । प्रमाण होय ! ॥१६॥

प्रमेयपरिच्छेदें । प्रमाणत्व नांदे ।
तें कायि स्वत:सिद्धें । वस्तूच्या ठायीं ? ॥१७॥

एवं वस्तूसी जाणों जातां । जाणणेंचि वस्तु तत्वता ।
मग जाणणें आणि जाणता । कैंचा उरे ? ॥१८॥

म्हणोनि सच्चित्सुख । हे बोल वस्तुवाचक ।
नव्हती; हे शेष । विचारांचे ॥१९॥

ऐसेनि इयें प्रसिध्दे । चालिलीं सच्चिदानंद पदें ।
मग द्रष्ट्या स्वसंवादें । भेटती जेव्हां ॥२०॥

ते वेळीं वरिसोनि मेघु । समुद्र होउनि वोघु ।
सरे दाऊनि मागु । राहे जैसा ॥२१॥

फळ विऊनि फुल सुके । फळनाशे रस पाके ।
तोहि रस उपखें । तृप्तिदानीं ॥२२॥

कां आहुति अग्नीआंतु । घालूनि वोसरे हातु ।
सुख चेवऊनि गीतु । उगा राहे ॥२३॥

नाना मुखा मुख दाऊनी । आरिसा जाय निगोनि ।
कां निदैलें चेववुनी । चेववितें जैसें ॥२४॥

तैसा सच्चिदानंदा चोखटा । दाऊनि द्रष्ट्या द्रष्टा ।
तिन्हीं पदें लागतीं वाटा । मौनाचिया ॥२५॥

जें जें बोलिजे तें तें नव्हे । होय तें तंव न बोलवे ।
साउलीवरी न मववे । मवितें जैसें ॥२६॥

मग आपलियाकडे । मावितया से पडे ।
तैं लाजहिला जो आखुडे । मविते जैसें ॥२७॥

जैसी सत्ताचि स्वभावें । असत्ता तंव नव्हे ।
मा सत्तात्व संभवे । सत्तेसि कायि ? ॥२८॥

आणि अचिदाचेनि नाशें । आलें जें चिन्मात्रदशे ।
आतां चिन्मात्रचि मा कैसें । चिन्मात्रीं इये ॥२९॥

नीद प्रबोधाच्या ठायीं । नसे तैसें जागणेंहि ।
तेवीं चिन्मात्रचि मा काई । चिन्मात्रीं ये ? ॥३०॥

ऐसें यया सुखपणें । नाहीं दुःख कीर होणें ।
मा सुख हें गणणें । सुखासि काई ? ॥३१॥

म्हणोनि सदसदत्वें गेलें । चिदचिदत्वें मावळलें ।
सुखासुख जालें । कांहीं ना कीं ॥३२॥

आतां द्वंद्वाचें लवंचक । सांडूनि दुणीचे कंचुक ।
सुखमात्रचि एक । स्वयें आथी ॥३३॥

वरी एकपणें गणिजे । तें गणितेनसीं ये दुजें ।
म्हणोनि हें न गणिजे । ऐसें एक ॥३४॥

तैसें सुखा आतोनि निथणें । तें सुखीयें सुखी तेणें ।
हें सुखमात्रचि मा कोणें । अनुभवावें ? ॥३५॥

जैं प्रकृति डंकु अनुकरे । तैं प्रकृति डंकें अवतरे ।
मां डंकूचि तैं भरे । कोणकोणा ? ॥३६॥

तैसें आपुलेनि सुखपणें । नाहीं जया सुखावणें ।
आणि नाहीं हेंही जेणें । नेणिजे सुखें ॥३७॥

आरिसा न पाहतां मुख । स्वयें सन्मुख ना विन्मुख ।
तेवीं नसोनी सुखासुख । सुखचि जें ॥३८॥

सर्व सिद्धांताचिया उजरिया । सांडोनिया निदसुरिया ।
आपुलिया हात चोरिया । आपणचि जो ॥३९॥

न लवितां ऊंसु । तैं जैसेनि असे रसु ।
तेथिंचा मीठांशु । तोचि जाणे ॥४०॥

कां न सज्जितां विणा । तो नादु जो अबोलपणा ।
तया तेणेंचि जाणा । होआवें लागे ॥४१॥

नाना पुष्पाचिया उदरा । न येतां पुष्पसारा ।
आपणचि भंवरा । होआवे पडे ॥४२॥

नाना न रांधितां रससोये । ते गोडी पां कैसी आहे ।
हें पाहणें तें नोहे । आणिकाजोगें ॥४३॥

तैसें सुखपणा येवो । लाजे आपुलें सुख पावों ।
तें आणिकां चाखों सुवों । येईल काईं ? ॥४४॥

दिहाचिया दुपारीं । चांदु जैसा अंबरीं ।
तें असणें चांदाचिवरी । जाणावें कीं ॥४५॥

रूप नाहीं तैं लावण्य । अंग नुठी तैं तारुण्य ।
क्रिया न फुटे तैं पुण्य । कैसें असे ॥४६॥

जैं मनाचा अंकूर नुपजे । तेथिलेनि मकरध्वजें ।
तोचि हन माजे । तरीचि घडे ॥४७॥

कां वाद्यविशेषाची सृष्टी । जैं जन्म नेघे दृष्टी ।
तैं नादु ऐशी गोष्टी । नादाचि जोगी ॥४८॥

नाना काष्ठाचिया विटाळा । वोसरलिया अनळा ।
लाग्णें तैं केवळा । अंगासीचि ॥४९॥

दर्पणाचेनि नियमें । वीणचि मुखप्रमे ।
आणिती तेचि वर्मैं । वर्मती येणें ॥५०॥

न पेरितां पीक जोडे । तें मुडाचि आहे रोकडें ।
ऐसिया सोई उघडें । बोलणें हें ॥५१॥

एवं विशेष सामान्य । दोहीं नातळे चैतन्य ।
तें भोगिजे अनन्य । तेणेंसीं सदा ॥५२॥

आतां यावरी जे बोलणें । तें येणेंचि बोलें शहाणें ।
जें मौनाचेंही निपटणें । पिऊनि गेलें ॥५३॥

एवं प्रमाणें अप्रमाण- । पण केलें प्रमाण ।
दृष्टांतीं वाइली आण । दिसावयाची ॥५४॥

अंगाचिया अनुपपति । आटलिया उपपत्ती ।
येथें उठली पांती । लक्षणाची ॥५५॥

उपाय मागील पाय । घेऊन झाले वाय ।
प्रतीति सांडिली सोय । प्रत्ययाची ॥५६॥

येथें निर्धारेंसी विचारु । निमोनि झाला साचारु ।
स्वामीच्या संकटी शूरु । सुभट्र जैसा ॥५७॥

नाना नाशु साधूनि आपुला । बोधु बोधें लाजिला ।
नुसुधेपणें थोंटावला । अनुभउ जेथे ॥५८॥

भिंगाचिया चडळा । पदरांचा पुंज वेगळा ।
करितां जैसा निफाळा । आंगाचा होय ॥५९॥

कां गजबजला उबा । पांघुरणें केळीचा गाभा ।
सांडी तेव्हेळीं उभा । कैंचा कीजे ? ॥६०॥

तैसें अनुभाव्य अनुभाविक । इहीं दोही अनुभूतिक ।
तें गेलिया कैचें एक । एकासिचि ॥६१॥

अनुभवो हा ठाववरी । आपुलीचि अवसरी ।
तेथें अक्षरांची हारी । वाईल काई ? ॥६२॥

कां परेसी पडे मिठी । तेथें नादासाळु नुठी ।
मा वावरिजैल ओंठीं । हें कें आहे ? ॥६३॥

चेइलियाही पाठीं । चेवणयाच्या गोठी ।
कां धाला बैसें पाठीं । रंधनाच्या ? ॥६४॥

उदैजलिया दिवसपती । तैं कीं दिवे सेजे येती ।
वांचुनि पिकला शेतीं । सुइजताती नांगर काई ? ॥६५॥

म्हणोनि बंधमोक्षाचें व्याज । नाहीं ; निमालें काज ।
आतां निरूपणाचें भोज । वोळगे जहीं ॥६६॥

आणि पुढिला कां आपणापें । वस्तु विसराचेनि हातें हारपें ।
मग शब्देंचि घेपे । आठवूनियां ॥६७॥

येतुलियाहि परौतें । चांगावें नाहीं शब्दातें ।
जऱ्ही स्मारकपणें कीर्तीतें । मिरवी हा जगीं ॥६८॥

॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्मृतानुभवे सच्चिदानंदपदत्रयविवरणं नाम पंचम प्रकरणं संपूर्णम् ॥

# शब्दखंडन

बाप उपयोगी शब्दु । स्मरणदानीं प्रसिध्दु ।
अमूर्ताचा विशदु । आरिसा नव्हे ? ॥१॥

पहातें अरिसा पाहे । तेथें कांहींचि नवल नव्हे ।
परि दर्पणें येणें होये । न पाहतें, पाहतें ॥२॥

वडिला अव्यक्ताचिया वंशा । उद्योत्कारु सूर्य जैसा ।
येणें येके गुणें आकाशा । अंबरत्व ॥३॥

अपण तंव खपुष्प । परि फळ दे जगद्रुप
शब्द मवीतैं (तें) उमप । कोण आहे ? ॥४॥

विधिनिशेधांचिया वाटा । दाविता हाचि दिवटा
बंधमोक्ष कळिकटा । शिष्टु हाची ॥५॥

हा अविद्येचा आंगी पडे । तैं नाथिलें ऐसें विरूढे ।
न लाहिजे तीन कवडे । साचा वस्तु ॥६॥

शुध्द शिवाच्या शरीरीं । कुमारु हा जीउ भरी ।
जेवीं आंगें पंचाक्षरी । तेविंचि बोलु ॥७॥

जिउ देहें बांधला । तो बोलें एके सुटला ।
आत्मा, बोलें भेटला । आपणयां ॥८॥

दिवसातें उगो गेला । तंव रात्रीचा द्रोहो आला ।
म्हणोनि सूर्यो या बोला । उपमा नव्हे ॥९॥

जे प्रवृत्ति आणि निवृत्ति । विरुध्दा इया हातु धरिती ।
मग शब्देंचि चालती । एकलेनि ॥१०॥

सहाय आत्मविद्येचें । करावया आपण वेंचे ।
गोमटें काय शब्दाचें । येकैक वानूं ॥११॥

किंबहुना शब्दु । स्मरणदानीं प्रसिध्दु ।
परि ययाही संबंधु । नाही येथें ॥१२॥

आत्मया, बोलाचें । कांहींचि उपेगा न वचे ।
स्वसंवेद्या कोणाचें । ओझें आथी ? ॥१३॥

आठवे कां विसरे । विषो होऊनि अवतरे ।
तरी वस्तूसी वस्तु, दुसरें । असेना कीं ॥१४॥

आपण आपणयातें आठवी विसरे केउतें ? ।
काय जीभ जिभितें । चाखे, न चाखे ? ॥१५॥

जागतेया नीद नाहीं । मा जागणें घडे काई ? ।
स्मरणास्मरण दोन्हीही । स्वरूपीं तैसीं ॥१६॥

सूर्यो रात्री पां नेणे । मा दिवो काय जाणे ? ।
तेवीं स्मरणास्मरणे (वीण) । आपण वस्तु ॥१७॥

एवं स्मरणास्मरण नाहीं । तरि स्मारकें काज काई ? ।
म्हणौनि इये ठाईं । बोलु न सरे ॥१८॥

आणिक येक शब्दें । काज कीर भलें साधे ।
परि धिंवसा न बंधे । विचारु येथें ॥१९॥

कां जे बोलें अविद्य नाशे । मग आत्मेनि आत्मा भासे ।
हें म्हणतखेवो पिसें आलेंचि कीं ॥२०॥

सूर्यो राति पां मारील । मा आपणया उदो करील ।
हे कुडो न सरती बोल । साचाच्या गांवीं ॥२१॥

चेईले निदे रुसे । ऐसी कें नीद असे ? ।
किं चेईले चेवो बैसें । ऐसे चेणें आहे ? ॥२२॥

म्हणोनि नाशापुरती । अविद्या नाही निरुती ।
नाही आत्मा आत्मस्थिति । रिगे ऐसा ॥२३॥

अविद्या तंव स्वरूपें । वांझेचें कीर जाउपें ।
मा तर्कांचे खुरपे ! । खांडे कोणा ? ॥२४॥

इंद्रधनुष्या सितें । कवण धनवईन लाविजेतें ।
तें दिसें तैसें होतें । साच जरी ? ॥२५॥

अगस्तीचिया कौतुका । पुरती जरी मृगतृष्णिका ।
तरी मार देतो तर्का । अविद्येसी ॥२६॥

साहे बोलाची वळघी । ऐसी अविद्या असे जगीं ।
तरी जाळूं ना कां आगी । गंधर्वनगरें ? ॥२७॥

नातरी दीपाचिये सोये । आंधारू कीर न साहे ।
तेथें कांहीं आहे । जावयाजोगें ? ॥२८॥

नातरी पाहावया दिवसु । वातीचा कीजे सोसु ।
तेव्हडाहि उद्वसु । उद्यमु पडे ॥२९॥

जेथे साउली न पडे तेथें नाही जेणें पाडें ।
मा पडे तेथें तेव्हडे । नाहींच कीं ॥३०॥

दिसतचि स्वप्न लटिकें । हें जागरीं होय ठाउकें ।
तेवीं अविद्याकाळी सतुकें । अविद्या नाही ॥३१॥

वोडंबरीचिया लेणिया । घरभरी आतुडलिया ।
नागवें नागविलिया । विशेषु काई ॥३२॥

मनोरथाचें परियळ । आरोगिजतु कां लक्ष वेळ ।
परि उपवासावेगळ । आनु आथी ? ॥३३॥

मृगजळ जेथ नुमंडे । तेथ असे पां कोरडें ।
माउमंडे तेथें जोडे । वोल्हांसु काई ? ॥३४॥

हें दिसे तैसें असे । तरी चित्रीचेनि पाउसें ।
वोल्हावतु कां मानुसें । आगरा तळीं ॥३५॥

कालवूनि आंधारें । लिहों येती अक्षरें ।
तरी मसीचिया बोरबारें । कां सिणावें ? ॥३६॥

आकाश काय निळें । न देखतु हे डोळे ? ।
तेवीं अविद्येचि टवाळें । जाणोनि घेईं ॥३७॥

अविद्या येणें नांवें । मी विद्यमानचि नव्हे ।
हे अविद्याची स्वभावें । सांगतसे ॥३८॥

आणि इये अनिर्वाच्यपण । तें दुजेंही देवांगण ।
आपुल्या अभावीं आपण । साधीतसे ॥३९॥

का हीच जरी आहे । तरी निर्द्धारु कां न साहे ? ।
वरी घटाभावें भोये । अंकित दिसे ? ॥४०॥

अविद्या नाशी आत्मा । ऐसी नव्हे प्रमा ।
सुर्या आंगीं तमा । जयापरी ॥४१॥

हे अविद्या तरी मायावी । परि मायावीपणचि लपवी ।
साचा आली अभावी । आपुला हे ॥४२॥

बहुतापरी ऐसी । अविद्या नाहीं आपैसीं ।
आतां बोलू हातवसी । कवणापरी ॥४३॥

साउलियेतें साबळें । हालयां भोय आदळे ।
कीं हालेनि अंतराळें । थोंटावे हातु ॥४४॥

कां मृगजळाचा पानीं । गगनाचा अलिंगनीं ।
नातरी चुंबनीं । प्रतिबिंबाचा ॥४५॥

उठावला वोथरे तवंका । तो सुनाथ पडे असिका ।
अविद्या नाशीं तर्का । तैसें होय ॥४६॥

ऐसी अविद्या नासावी । वाहेल जो जीवीं ।
तेणें साली काढावी । आकाशाची ॥४७॥

तेणें शेळीगळां दुहावीं । गुडघां वास पाहावी ।
वाळवोनि काचरी करावी । सांजवेळेची ॥४८॥

जांभई वांटूनि रसु । तेणें काढावा बहुवसू ।
कालवूनि आळसू । मोदळा पाजावा ॥४९॥

तो पाटा पाणी परतु । पडली साउली उलथु ।
वारयाचे तांथु । वळु सुखें ॥५०॥

तो बागुलातें मारू । प्रतिबिंब खोळे भरू ।
तळहातींचे विंचरू । केंस सुखें ॥५१॥

घटाचें नाहींपण फोडू । गगनाची फुलें तोडू ।
सशाचें मोडू । शिंग सुखें ॥५२॥

तो कापुराची मसी करू । रत्नदीपीं काजळ धरू ।
वांजेचें लेंकरूं । [अरणु सुखें ॥५३॥

तो अंवसेनेचि सुधाकरें । पोसू पाताळीची चकोरें ।
मृगजळींचीं जळचरें । गाळूं सुखें ॥५४॥

अहो हें किती बोलावें । अविद्या रचिली अभावें ।
आतां काई नाशावें । शब्दें येणें ॥५५॥

नाहीं तयाचे नाशें । शब्द न ये प्रमाणदशे ।
अंधारीं अंधारा जैसें । नव्हे रूप ॥५६॥

अविद्येची नाहीं जाती । तेथें नाहीं म्हणतया युक्ती ।
जेवी दुपारीं कां वाती । आंगणींचिया ॥५७॥

न पेरितां शेती । जे कीं सवगणिया जाती ।
तयां लाजेपरौति । जोडी आहे ? ॥५८॥

खवणियाच्या आंगा । जेणें केला वळघा ।
तो न करितांचि उगा । घरीं होता ॥५९॥

पाणियावरी वरखु । होता कें असे विशेखु ।
अविद्यानाशी उन्मेखु । फांकावा तैसा ॥६०॥

माप मापपणें श्वाघे । जंव आकाश मवूं न रिघे ।
तम पाहतां वाउगें । दीपाचें जन्म ॥६१॥

गगनाची रससोये । जीभ जैं आरोगु जाये ।
मग रसना हें होये । आडनांव कीं ॥६२॥

नव्हतेनि वल्लभे । अहेवपण कां शोभे ।
खातां केळीचे गाभे । न खातां गेले ॥६३॥

स्थूळ सूक्ष्म कवण येकु । पदार्थ न प्रकाशी अर्कु ।
परि रात्रीविषयीं अप्रयोजकु । जालाचि कीं ॥६४॥

दिठी पाहतां काय न फावे । परि निदेतें तंव न देखवे ।
चेता ते न संभवे । म्हणोनियां ॥६५॥

चकोराचिया उद्यमा । लटिकेपणाची सीमा ।
जरि दिहाचि चंद्रमा । गिंवसूं बैसे ॥६६॥

नुसुधियेचि साचा । मुका होय वाचरुकाचा ।
अंतराळीं पायांचा । पेंधा होय ॥६७॥

तैसीं अविद्येसन्मुखें । सिद्धचि प्रतिषेधकें ।
उठलींच निरर्थकें । जल्पें होतीं ॥६८॥

अंवसे आला सुधाकरु । न करीच काय अंधकारु ? ।
अविद्यानाशीं विचारु । तैसा होय ॥६९॥

नाना न निफजतेनि अन्नें । जेवणें तेंचि लंघनें ।
निमालेनि नयनें । पाहणाचि अंधु ॥७०॥

कैसीही वस्तु नसे । जैं शब्दाचा अर्थ हों बैसे ।
तैं निरर्थकपणें नासे । शब्दहि थिता ॥७१॥

आतां अविद्याचि नाहीं । हें कीर म्हणो काई ।
परी ते नाशितां कांहीं । नुरेची शब्दाचें ॥७२॥

यालागिं अविद्येचिया मोहरां । उठलियाहि विचारा ।
आंगाचाची संसारा । होऊनि ठेला ॥७३॥

म्हणोनि अविद्येचेनि मरणें । प्रमाणा येईल बोलणें ।
हें अविद्याचि नाहींपणें । नेदी घडों ॥७४॥

आणि आत्मा हन आत्मया । दाऊनी बोलु महिमेया ।
येईल हें साविया । विरुद्धचि ॥७५॥

आपणया आपणपेंसी । लागलें लग्न कवणे देशीं ।
कीं सूर्य अंग ग्रासी । ऐसें ग्रहण आहे ? ॥७६॥

गगन आपणया निघे ? । सिंधु आपणा रिघे ? ।
तळहात काय वळघे । आपणयां ? ॥७७॥

सूर्य सूर्यासि विवळे ? । फळ आपणया फळें ? ।
परिमळु परिमळें । घेपता ये ? ॥७८॥

चराचरा पाणी पाजणी । करूं येईल येके क्षणीं ।
परि पाणियासि पाणि । पाजवे कायी ? ॥७९॥

साठीं तिशा दिवसां । माजीं एखादा ऐसा ।
जे सूर्यासीच सूर्य जैसा । डोळा दावी ॥८०॥

कृतांत जरी कोपेल । तरी त्रैलोक्य हें जाळील ।
वांचूनि आगी लावील । आगीसि काई ? ॥८१॥

आपणपें आपणया । दर्पणेवीण धात्रेया ।
समोर होआवया । ठाकी आहे ? ॥८२॥

दिठी दिठीतें रिघों पाहे ? । रुचि रुचीतें चाखों सुये ? ।
कीं चेतया चेतऊं ये ? । हें नाहींच कीं ॥८३॥

चंदन चंदना लावी ? । रंगु रंगपणा रावी ।
मोतींपण मोतीं लेववी । ऐसें कैंचें ? ॥८४॥

सोनेंपण सोनें कसी । दीपपण दीप प्रकाशी ।
रसपणा बुडी ते रसीं । तें कें जोडे ? ॥८५॥

आपुलिये मुकुटीं समर्था । चंद्र बैसविला सर्वथा ।
परि चंद्र चंद्राचिये माथा । वाऊं ये काई ? ॥८६॥

तैसा आत्मराजु तंव । ज्ञानमात्रचि भरींव ।
आतां ज्ञानें ज्ञानासि खेंव । कैसें दीजे ? ॥८७॥

आपुलेनि जाणपणें । आपणयातें जाणों नेणे ।
डोळ्या आपुलें पाहाणें । दुवाड जैसें ॥८८॥

आरसा आपुलिये । आंगीं आपण पाहे ।
तरी जाणणें जाणों लाहे । आपणयातें ॥८९॥

दिगंतापैलीकडेचें । धांवोनि सुरिया खोंचे ।
मा तियेका तियेचें । आंग फुटे ? ॥९०॥

रसवृत्तीसी उगाणें । घेऊनि जिव्हाग्र शाहाणें ।
परि कायी कीजे नेणे । आपणापें चाखों ॥९१॥

तरि जिव्हे काई आपलें । चाखणें हन ठेलें ? ।
तैसे नव्हे संचलें । तेंचि तेकीं ॥९२॥

तैसा आत्मा सच्चिदानंदु । आपणया आपण सिद्धु ।
आतां काय दे शब्दु । तयाचें तया ॥९३॥

कोणाही प्रमाणाचेनि हातें । वस्तु घे ना नेघे आपणयातें ।
जो स्वयेंचि आइतें । घेणें ना न घेणें ॥९४॥

म्हणोनि आत्मा आत्मलाभें । नांदऊनि शब्द शोभे ।
येईल ऐसा न लभे । उमसुं घेवों ॥९५॥

एवं माध्यान्हींची दिवी । तम धाडी ना दिवो दावी ।
तैसी उपभयतां पदवी । शब्दा जाली ॥९६॥

आतां अविद्या नाहींपणें । नाहीं तयेतें नासणें ।
आत्मा सिद्धुचि मा कोणें । काय साधावें ? ॥९७॥

ऐसा उभय पक्षीं । बोला न लाहोनि नखी ।
हारपला प्रळयोदकीं । वोघु जैसा ॥९८॥

आतां बोला भागु कांहीं । असणें जयाच्या ठाईं ।
अर्थता तरि नाहीं । निपटुनियां ॥९९॥

बागुल आला म्हणितें । बोलणें जैसें रितें ।
कां आकाश वोळंबतें । तळहातीं ॥१००॥

तैसीं निरर्थकें जल्पें । होउनियां सपडपें ।
शोभती जैसें लेपे । रंगावरी ॥१०१॥

एवं शब्दैकजीवनें । बापुडीं ज्ञानें अज्ञानें ।
साचपणें वनें । चित्रींचीं जैसीं ॥१०२॥

या शब्दाचा निमाला । महाप्रळयो हो सरला ।
अभ्रासवें गेला । दुर्दिनु जैसा ॥१०३॥

॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्मृतानुभवे शब्दखंडनं नाम षष्ठम प्रकरणं संपूर्णम् ॥

# अज्ञानखंडन

येऱ्हवीं तरी अज्ञाना । जैं ज्ञानाची नसे क्षोभणा ।
तैं तरि काना । खालीच दडे ॥१॥

अंडसोनि अंधारीं । खद्योत दीप्ति शिरी ।
तैसें लटिकेंवरी । अनादि होय ॥२॥

जैसी स्वप्ना स्वप्नीं महिमा । तमीं मानु असे तमा ।
तेवीं अज्ञाना गरिमा । अज्ञानींचि ॥३॥

कोल्हेरीचे वारु । न येती धारकीं धरूं ।
न येणे लेणा शृंगारूं । वोडंबरीचा ॥४॥

हें जाणणेयाच्या घरीं । खोचिलेंहि आन न करी ।
काई चांदिणां उठे लहरी । मृगजळाची ? ॥५॥

आणि ज्ञान हें जें म्हणिजे । तें अज्ञानचि पां दुजें ।
येक लपऊनि दाविजे । येक नव्हे ? ॥६॥

असो आता हा प्रस्तावो । आधीं अज्ञानाचा धांडोळा घेवो ।
मग तयाच्या साचीं लाहो । ज्ञानहि लटिकें ॥७॥

या अज्ञान ज्ञानातें । आंगींचि आहे जितें ।
तरी जेथें असे, तयातें । नेण कां न करी ? ॥८॥

अज्ञान जेथ असावें तेणें सर्वनेण होआवें ।
ऐसी जाती स्वभावें अज्ञानाची ॥९॥

तरी शास्त्रमत ऐसें । जे आत्माचि अज्ञान असे ।
तेणेचि तो गिंवसे । आश्रो जरी ॥१०॥

तरी नुठितां दुजें । जैं अज्ञान आहे बिजें ।
तैं तेचि आथी हे बुझे । कोण येथे ? ॥११॥

अज्ञान तंव आपणयातें । जडपणें नेणे निरुतें ।
आणि प्रमाण प्रमाणातें । होत आहे ? ॥१२॥

या लागिं जरी अज्ञान । करील आपुलें ज्ञान ।
हे म्हणत खेवों घेववी मौन । विरोधुचि ॥१३॥

आणि जाणती वस्तु येक । ते येणे अज्ञानें कीजे मूर्ख ।
तैं अज्ञान हे लेख । कवण धरी ? ॥१४॥

अहो आपणयाहि पुरता । नेणु न करवे जाणता ।
तयातें अज्ञान म्हणतां । लाजिजे कीं ? ॥१५॥

आभाळें भानु ग्रासे । तैं आभाळ कोणें प्रकाशें ? ।
सुषुप्ती सुषुप्तया रुसे । तैं तेचि कोणा ? ॥१६॥

तैसें अज्ञान असे जेथें । तेंचि जरी अज्ञान आते ।
तरी अज्ञान अज्ञानातें । नेणतां गेलें ॥१७॥

ना तरी अज्ञान येक घडे । हें जयास्तव निवडे ।
तें अज्ञान नव्हे फुडे । कोणे काळीं ॥१८॥

पडळही आथी डोळा । आणि डोळा नव्हे आंधळा ।
तरी आथी या पोकळा । बोलिया कीं ॥१९॥

इंधनाच्या आंगी । खवळलेन आगी ।
तें न जळे, तैं वाउगी । शक्तिचि ते ॥२०॥

आंधारु कोंडुनि घरीं । घरा पडसायी न करी ।
तैं आंधार इहीं अक्षरीं । न म्हणावा कीं ? ॥२१॥

वो जावों नेदी जागणें । तये निदेतें नीद कोण म्हणे ।
दिवसा नाणी उणें । तैं रात्रिचि कैंची ॥२२॥

तैसें आत्मा अज्ञान असकें । असतां तो न मुके ।
तैं अज्ञान शब्दा लटिकें । आलेंच कीं ॥२३॥

येऱ्हवी तरी आत्मया । माजीं अज्ञान असावया ।
कारण म्हणतां न्यावा । चुकी येईल कीं ॥२४॥

अज्ञान तममेळणी । आत्मा प्रकाशाची खाणी ।
आतां दोहीं मिळणी । येकी कैसी ? ॥२५॥

स्वप्न आणि जागरु । आठउ आणि विसरु ।
इयें युग्में येका हारु । चालती जरी ॥२६॥

शीता तापा एकवट । वाहे वस्तीची वाट ।
कां तमें बांधिजे मोट । सूर्यरश्मींची ॥२७॥

नाना राती आणि दिवो । येती येके ठाईं राहों ।
तैं आत्मा जिवें जिवो । अज्ञानाचेनि ॥२८॥

हें असो मृत्यु आणि जिणें । इयें शोभती जरी मेहुणे ।
तरी आत्मेनि असणें । अज्ञानेंसि ॥२९॥

अहो आत्मेन जे बाधे । तेंचि आत्मेनसि नांदे ? ।
ऐसीं काईसीं विरुद्धें । बोलणीं इयें ॥३०॥

अहो अंधारपणाची पैज । सांडूनी अंधार तेज ।
जाला तैं सहज । सूर्यचि निभ्रांत ।३१॥

दुलांकूडपण सांडलें । आणि आगीपण मांडिलें ।
तैं तेंचि आगी जालें । इंधन कीं ॥३२॥

का गंगा पावत खेंवो । आनपणाचा ठावो ।
सांडी तैं गंगा हो । लाहे पाणी ॥३३॥

तैसें अज्ञान हें अज्ञान नोहे । तरी आत्मा असकें असों लाहे ।
येऱ्हवीं अज्ञान होये । लागलाचि ॥३४॥

आत्मेनसी विरोधी । म्हणोनि नुरेचि इये संबंधीं ।
वेगळी तरी सिद्धि । जायेचिना ॥३५॥

लवणाची मासोळी । जरी जाली निवाळी ।
तरी जळीं ना जळावेगळी । न जिये जेवीं ॥३६॥

जें अज्ञान येथें नसे । तरीच आत्मा असे ।
म्हणोनि बोलणीं वाइसें । नायकावीं कीं ॥३७॥

दोरीं सर्पाभास होये । तो तेणें दोरें बांधों ये ? ।
ना दवडणें न साहे । जयापरी ॥३८॥

नाना पुनिवेचे आंधारें । दिहा भेणें रात्रीं महुरें ।
कीं येतांचि सुधाकरें । गिळिजे जेवीं ॥३९॥

तियापरी उभयतां । अज्ञान शब्द गेला वृथा ।
हा तर्कावांचूनि हाता । स्वरूपें नये ॥४०॥

तरी अज्ञान स्वरूपें कैसें । काय कार्यानुमेय असे ।
कीं प्रत्यक्षचि दिसे । धांडोळूं आतां ॥४१॥

अहो प्रत्यक्षादि प्रमाणीं । कीजे जयाची घेणी ।
ते अज्ञानाची करणी । अज्ञान नव्हे ॥४२॥

जैसी अंकुरेंसी सरळ । वेली दिसे वेल्हाळ ।
तें बीज नव्हे केवळ । बीजकार्य होय ॥४३॥

कां शुभाशुभ रूपें । स्वप्नदृष्टी आरोपें ।
तें नीद नव्हे जाउपें । निदेचें कीं ॥४४॥

नाना चांदु एक असे । तो व्योमीं दुजा दिसे ।
तें तिमिरकार्य जैसें । तिमिर नव्हे ॥४५॥

तैसें प्रमाता प्रमेय । प्रमाण जें त्रय ।
तें अज्ञानाचें कार्य । अज्ञान नव्हे ॥४६॥

म्हणोनि प्रत्यक्षादिकीं । अज्ञान कार्यविशेखीं ।
नेघे तें असेये विखीं । आनु नाहीं ॥४७॥

अज्ञान कार्यपणें । घेइजे तें अज्ञान म्हणे ।
तरी घेतांहि करणें । तयाचेंची ॥४८॥

स्वप्नीं दिसे तें स्वप्न । मा देखता काय आन ।
तैसें कार्यचि अज्ञान । केवळ जरी ॥४९॥

तरी चाखिला गुळ गुळें । माखिलें काजळ काजळें ।
कां घेपे देपे शुळें । हालया सुळु ॥५०॥

तैसें कारण अभिन्नपणें । कार्यही अज्ञान होणें ।
तें अज्ञानचि मा काय कोणें । घेपे देपे ॥५१॥

आतां घेतें घेइजेतें ऐसा । विचारु नये मानसा ।
तरी प्रमाण जाला मासा । मृगजळींचा ना ? ॥५२॥

तंव प्रमाणाचिया मापा । न संपडेचि जे बापा ।
तया आणि खपुष्पा । विशेषु काई ? ॥५३॥

मा हे प्रमाणचि नुरवी । आतां आथी हें कोण प्रस्तावी ।
येणें बोलें ही जाणावी । अज्ञानउखी ॥५४॥

एवं प्रत्यक्ष अनुमान । प्रमाणां भाजन ।
नहोनि जालें अज्ञान । अप्रमाण ॥५५॥

ना स्वकार्यातें विये । जें कारणपणा नये ।
मी अज्ञान ऐसें बिहे । मानूं साचें ॥५६॥

आत्मया स्वप्न दाऊं । न शके कीर बहू ।
परि ठायें ठाउ । निदेजउं नेणें ॥५७॥

हें असो जिये वेळे । आत्मपणेंचि निखळें ।
आत्मा अज्ञानमेळें । असे तेणें ॥५८॥

जैसें न करितां मंथन । काष्ठीं अवस्थान ।
जैसें कां हुताशन । सामर्थ्याचें ॥५९॥

तैसें आत्मा ऐसें नांव । न साहे आत्मयाची बरव ।
तैं कांहीं अज्ञान हांव । बांधतें कां ? ॥६०॥

काइ दीप जैं न लाविजे । तैंचि काजळी फेडिजे ।
कां नुगवत्या वाळिजे । रुखाची छाया ॥६१॥

नाना नुठितां देहदशा । कालऊनि लाविजे चिकसा ।
न घडितां आरिसा । उटिजे काई ॥६२॥

कां वोहाच्या दुधीं । सायचि असावी आधीं ।
मग ते फेडूं इये बुद्धी । पवाडु कीजे ॥६३॥

तैसें आत्मयाच्या ठाई । जैं आत्मपणा ठवो नाहीं ।
तैं अज्ञान कांहीं । सारिखें कैसें ॥६४॥

म्हणोनि तेव्हांही अज्ञान नसे । हें जालेंचि आहे आपैसें ।
तां रिकामेंचि काइसें । नाहीं म्हणो ॥६५॥

ऐसाहि आत्मा जेव्हां । जैं नातळे भावाभावा ।
अज्ञान असे तेव्हां । तरी तें ऐसें ॥६६॥

जैसें घटाचें नाहींपण । फुटोनि होय शतचूर्ण ।
कीं सर्वांपरी मरण । मालवलें कीं ॥६७॥

नाना निदे नीद आली । कीं मूर्छा मूर्छे गेली ।
कीं आंधारी पडली । अंधकूपीं ॥६८॥

का अभाव अवघडला । का केळीचा गाभा मोडला ।
चोखळा आसुडला । आकाशाचा ॥६९॥

कां निवटलिया सूदलें विख । मुकियाचें बांधलें मुख ।
नाना नुठितां लेख । पुसिलें जैसें ॥७०॥

तैसें अज्ञान आपुली वेळ । भोगी हेचि टवाळ ।
आतां तरी केवळ । वस्तु होऊनि नसे ॥७१॥

देखा वांझ कैसी विये ? । विरूढती भाजली बियें ? ।
कीं सूर्य कोण्हा लाहे । अंधारातें ? ॥७२॥

तैसा चिन्मात्रे चोखडा । भलतैसा अज्ञानाचा झाडा ।
घेतला तरी पवाडा । येईल काई ? ॥७३॥

जे सायेचिये चाडे । डहुळिजे दुधाचें भांडें।
ते दिसे कीं विघडे । तैसें हें पां ॥७४॥

नाना नीद धरावया हातीं । चेऊनी ऊठिला झडती ।
ते लाभे कीं थिती । नासिली होय ॥७५॥

तेवीं पाहावया अज्ञान ऐसें । हें आंगीं पिसें काइसें ।
न पाहतां आपैसें । न पाहणेंचि कीं ॥७६॥

एवं कोण्हेही परी । अज्ञानभावाची ऊजरी ।
न पडेचि नगरीं । विचाराचिये ॥७७॥

अहो कोण्हेही वेळे । आत्मा अथवा वेगळें ।
विचाराचे डोळे । देखते का ? ॥७८॥

ना निर्धाराचें तोंड न माखे । प्रमाण स्वप्नींही नाइके ।
कीं निरुती हून मुके । अनसाईपणा ॥७९॥

इतुलियाही भागु । अज्ञानाचा तरी तो मागु ।
निगे ऐसा बागु । पडतां कां देवा ॥८०॥

अंवसेचेनि चंद्रबिंबें । निर्वाळिलिये शोभे ।
कां मांडलें जैसे खांबे । शशविषाणाचे ॥८१॥

नाना गगनौलाचिया माळा । वांजेच्या जालया गळा ।
घापती तो सोहळा । पाविजत असे ॥८२॥

आणून कांसवीचें तुप । भरू आकाशाचें माप ।
तरी साचा येती संकल्प । ऐसे ऐसे ॥८३॥

आम्हीं येऊनि जाऊनि पुढती । अज्ञान आणावें निरुती ।
तें नाहीं तरी किती । वतवतूं पां ॥८४॥

म्हणोनि अज्ञान अक्षरें । नुमसूं आतां निदसुरें ।
परी आन येक स्फुरे । इयेविषयीं ॥८५॥

आपणया ना आणिकातें । देखोनि होय देखतें ।
वस्तु ऐसिया पुरतें । नव्हेचि आंगें ॥८६॥

तरी ते आपणयापुढें । दृश्य पघळे येव्हडें ।
आपण करी फुडें । द्रष्टेपणें ॥८७॥

जेथ आत्मत्वाचें सांकडे । तेथ उठे हें येव्हडें ।
उठिलें तरी रोकडें । देखतसों ॥८८॥

न दिसे जरी अज्ञान । तरी आहे हें नव्हे आन ।
यया दृश्यानुमान । प्रमाण जालें ॥८९॥
ना तरी चंद्रु येक असे । तो व्योमीं दुणावला दिसे ।
तरी डोळां तिमिर ऐसें । मानूं ये कीं ॥९०॥

भूमीवेगळीं झाडें । पाणी घेती कवणीकडे ।
न दिसती आणि अपाडें । साजीं असती ॥९१॥

तरी भरंवसेनि मुळें । पाणी घेती हें न टळें ।
तैसें अज्ञान कळें । दृष्यास्तव ॥९२॥

चेइलिया नीद जाये । निद्रिता तंव ठाउवी नोहे ।
परी स्वप्न दाऊनि आहे । म्हणों ये कीं ॥९३॥

म्हणोन वस्तुमात्रें चोखें । दृश्य जरी येव्हडें फांके ।
तेव्हां अज्ञान आथी सुखें । म्हणों ये कीं ॥९४॥

अगा ऐसिया ज्ञानातें । अज्ञान म्हणणें केउतें ।
काय दिवो करी तयातें । अंधारु म्हणिपे ? ॥९५॥

अगा चंद्रापासून उजळ। जेणें राविली वस्तु धवळ।
तयातें काजळ। म्हणिजतसे ॥९६॥

आगीचें काज पाणी। निफजा जरी आणी।
अज्ञान इया वहणी। मानूं तरी तें ॥९७॥

कळीं पूर्ण चंद्रमा। आणून मेळवी अमा।
तरी ज्ञान हें अज्ञान नामा। पात्र होईजे ॥९८॥

वोरसोनि लोभें। विष कां अमृतें दुभे।
ना दुभे तरी लाभे। विषचि म्हणणें ॥९९॥

तैसा जाणणेयाचा वेव्हारू। जेथें माखला समोरु।
तेथें आणिजे पुरू। अज्ञानाचा ॥१००॥

तया नांव अज्ञान ऐसें। तरी ज्ञान होआवें तें कैसें ?।
येऱ्हवीं कांहींचि असे। आत्मा काई ? ॥१०१॥

कांहींच जया न होणें। होय तें स्वतां नेणे।
तरी शून्याचीं देवांगणें। प्रमाणासी ॥१०२॥

असे म्हणावयाजोगें। नाचरे कीर आंगें।
परी नाहीं हें न लागे। जोडावेंचि ॥१०३॥

कोणाचे असणेंनवीण असे। कोणी न देखतांचि दिसे।
हें आथी तरी काईसें। हरतलेपण ॥१०४॥

मिथ्यावादाची कुटी आली। ते निवांतचि साहिली।
विशेषाही दिधली। पाठी जेणें ॥१०५॥

जो निमालीही नीद देखे। तो सर्वज्ञ येवढें काय चुके ?।
परी दृश्याचिये न टेके। सोईं जो ॥१०६॥

वेद काय काय न बोले। परी नांवचि नाहीं घेतलें।
ऐसें कांहीं जोडिलें। नाहीं जेणें ॥१०७॥

सूर्यो कोणा न पाहे ? । परि आत्मा दाविला आहे ? ।
गगनें व्यापिता ठाये । ऐसी वस्तु ॥१०८॥

देह हाडांची मोळी । मी म्हणोनि पोटाळी ।
तो अहंकारु गाळी । पदार्थु हा ॥१०९॥

बुद्धि बोद्ध्या सोके । ते येव्हडी वस्तु चुके ।
मना संकल्प निके । याहीहुनि ॥११०॥

विषयाची बरडी । अखंड घासती तोंडीं ।
तियें इंद्रियें गोडी । न घेपती हे ॥१११॥

परी नाहींपणासगट । खाऊनि भरिलें पोट ।
ते कोणाही सगट । कां फावेल ? ॥११२॥

जो आपणासी नव्हे विखो । तो कोणा लाहे देखो ।
जे वाणी न सके चाखों । आपणापें ॥११३॥

हें असो नामें रूपें । पुढां सुनि अमूपें ।
जेथें आलीच वासिपे । अविद्या हे ॥११४॥

म्हणोनि आपलेंचि मुख । पाहावयाची भूक ।
न वाणे मा आणिक । कें रिघेल ? ॥११५॥

नाडिले जें वादीकोडें । आंतुचि बाहेर सवडे ।
तैसा निर्णो सुनाथा पडे । केला जेथें ॥११६॥

कां मस्तकान्त निर्धारिली । जो छाया उडों पाहे आपुली ।
तयाची फांवली । बुद्धि जैसी ॥११७॥

तैसें टणकोनि सर्वथा । हे ते ऐसी व्यवस्था ।
करी तो चुके हाता । वस्तूचा जिये ॥११८॥

आतां सांगिजे तें केउतें । शब्दाचा संसारा नाहीं जेथें ।
दर्शना बीजें तेथे । जाणीव आणी ? ॥११९॥

जयाचेनि बळें । अचक्षुपण आंधळें ।
फिटोनि वस्तु मिळे । देखणी दशा ॥१२०॥

आपुलेंचि दृश्यपण । उमसो न लाहे आपण ।
द्रष्टत्वा कीर आण । पडली असतां ॥१२१॥

कोणा कोण भेटे ? । दिठी कैंची फुटे ? ।
ऐक्यासकट पोटें । आटोनि गेलीं ॥१२२॥

येव्हढेंही सांकडें । जेणें सारोनि येकीकडे ।
उघडिलीं कवाडें । प्रकाशाचीं ॥१२३॥

दृश्याचिया सृष्टी । दिठीवरी दिठी ।
उठलिया तळवटीं । चिन्मात्रची ॥१२४॥

दर्शनऋद्धि बहुवसा । चिच्छेषु मातला ऐसा ।
जे शिळा न पाहे आरिसा । वेद्यरत्नाचा ॥१२५॥

क्षणीं क्षणीं नीच नवी । दृश्याची चोख मदवी ।
दिठीकरवीं वेढवी । उदार जे ॥१२६॥

मागिलिये क्षणीचीं अंगें ।पारुसी म्हणोनियां वेगें ।
सांडूनि दृष्टि रिगे । नवेया रूपा ॥१२७॥

तैसीच प्रतिक्षणीं । जाणिवेचीं लेणीं ।
लेऊनि आणी । जाणतेपण ॥१२८॥

तया परमात्मपदीचें शेष । ना काहीं तया सुसास ।
आणि होय येव्हडी कास । घातली जेणें ॥१२९॥

सर्वज्ञतेची परी । चिन्मात्राचे तोंडवरी ।
परी तें आन घरीं जाणिजेना ॥१३०॥

एवं ज्ञानाज्ञान मिठी । तेंही फांकतसे दिठी ।
दृश्यपणें ये भेटी । आपणपयां ॥१३१॥

तें दृश्य मोटकें देखें । आपण स्वयें दृष्टत्वें तोखे ।
तेंचि दिठीचेनि मुखें । माजीं दाटे ॥१३२॥

तेव्हां घेणें देणें घटे । परी ऐक्याचें सूत न तुटे ।
जेवीं मुखीं मुख वाटे । दर्पणें केलें ॥१३३॥

अंगें अंगवरी पहुडे । चेइला वेगळा न पडे ।
तया वारुवाचेनि पाडें । घेणें देणें ॥१३४॥

पाणी कल्लोळाचेनि मिसें । आपणपें वेल्हावे जैसें ।
वस्तु वस्तुत्वें खेळों ये तैसें । सुखें लाहे ॥१३५॥

गुंफिवा ज्वाळांचिया माळा । लेइलियाही अनळा ।
भेदाचिया आहाळां । काय पडणें आहे ? ॥१३६॥

किं रश्मीचेनि परिवारें । वेढुनि घेतला थोरें ।
तरी सूर्यासि दुसरें । बोलों येईल ? ॥१३७॥

चांदणियाचा गिंवसु । चांदावरी पडिलिया बहुवसु ।
काय केवळपणीं त्रासु । देखिजेल ? ॥१३८॥

दळाचिया सहस्रवरी । फांको आपुलिया परी ।
परी नाहीं दुसरी । भास कमळीं ॥१३९॥

सहस्रवरी बाहिया । आहाती सहस्रर्जुना राया ।
तरी तो काय तिया । येकोत्तरावा ? ॥१४०॥

सौकटाचिया वोजा । पसरो कां बहू पुंजा ।
परी ताथुवीं दुजा । भाव आहे ? ॥१४१॥

कोडीवरी शब्दांचा । मेळावा घरीं वाचेचा ।
मीनला तऱ्ही वाचा । मात्र कीं ते ॥१४२॥

तैसे दृश्याचे डाखळे । नाना दृष्टीचे उमाळे ।
उठती लेखावेगळे । द्रष्टत्वेंचि ॥१४३॥

गुळाचा बांधा । फुटलिया मोडीचा धांदा ।
जाला तरी नुसधा । गूळचि कीं तो ॥१४४॥

तैसें हें दृश्य देखो । कीं बहू होऊनि फांको ।
परी भेदाचा नव्हे विखो । तेचि म्हणोनि ॥१४५॥

तया आत्मयाच्या भाखा । न पडेचि दुसरी रेखा ।
जऱ्ही विश्वा अशेखा । भरला आहे ॥१४६॥

दुबंधा क्षिरोदकीं । बाणें परी अनेकीं ।
दिसती तरी तितुकीं । सुतें आथी ? ॥१४७॥

पातयाचि मिठी । नुकलितां दिठी ।
अवघियाची सृष्टी । पाविजे जरी ॥१४८॥

न फुटतां बीजकणिका । माजीं विस्तारे वटु असिका ।
तरी अद्वैतफांका । उपमा आथी ॥१४९॥

मग मातें म्यां न देखावें । ऐसेही भरे हावें ।
तरी आंगाचिये विसवे । सेजेवरी ॥१५०॥

पातयाचि मिठी । पडलिया कीजे दिठी ।
आपुलेचि पोटीं । रिगोनि असणें ॥१५१॥

कां नुदेलिया सुधाकरु । आपणपें भरे सागरु ।
ना कूर्मी गिली विस्तारु । आपेंआप ॥१५२॥

अवसेचिये दिवसीं । सतराविये अंशीं ।
स्वयें जैसें शशी । रिगणें होय ॥१५३॥

तैसें दृश्य जिणतां द्रष्टे । पडले जैताचिये कुटे ।
तया नांव वावटे । आपणपयां ॥१५४॥

सहजें आघवेंचि आहे । तरी कोणा कोण पाहे ? ।
तें न देखणेंचि आहे । स्वरूप निद्रा ॥१५५॥

नाना न देखणें नको । म्हणे मीचि मातें देखो ।
तरी आपेंआप विखो । अपैसें असे ॥१५६॥

जें अनादिच दृश्यपणें । अनादिच देखणें ।
हें आतां कायी कोणें । रचूं जावें ? ॥१५७॥

अवकाशेशीं गगना । गतीसीं पवना ।
कीं दीप्तीसीं तपना । संबंधु कीजे ? ॥१५८॥

विश्वपणें उजिवडे । तरी विश्व देखे फुडें ।
ना तें नाहीं तेव्हढें । नाहींची देखे ॥१५९॥

विश्वाचें असे नाहीं । विपायें बुडालियाही ।
तऱ्ही दशा ऐसिही । देखतचि असे ॥१६०॥

कापुराहि आथी चांदिणें । कीं तोचि न माखे तेणें ।
तैसें केवळ देखणें । ठायें ठावो ॥१६१॥

किंबहुना ऐसें । वस्तु भलतिये दशे ।
देखतचि असे । आपणपयातें ॥१६२॥

मनोरथांचीं देशांतरें । मनीं प्रकाशून नरें ।
मग तेथें आदरें । हिंडे जैसा ॥१६३॥

कां दाटला डोळा डोळ्यां । डोळा चितारा होऊनियां ।
स्फुरे चोख म्हणौनियां । विस्मो नाहीं ॥१६४॥

यालागीं एकें चिद्रूपें । देखिजे कां आरोपे ।
आपणयां आपणपें । काय काज ? ॥१६५॥

किळेचें पांघरुन । आपजवी रत्न कोण ? ।
कीं सोने ले सोनें पण । जोड जोडूं ? ॥१६६॥

चंदन सौरभ वेढी ? । कीं सुधा आपणया वाढी ? ।
कीं गूळ चाखे गोडी ? । ऐसें आथी हें ? ॥१६७॥

कीं उजाळाचे किळे । कापुरा पुटीं दिधलें ? ।
कीं ताऊन ऊन केलें । आगीतें काई ? ॥१६८॥

ना ना ते लता । आपुले वेली गुंडाळितां ।
घर करी न करितां । जयापरी ॥१६९॥

कां प्रभेचा उभला । दीपप्रकाश संचला ।
तैसा चैतन्यें गिंवसला । चिद्रूप स्फुरे ॥१७०॥

ऐसें आपणया आपण । आपुलें निरीक्षण ।
करावें येणेंवीण । करितुचि असे ॥१७१॥

ऐसें हें देखणें न देखणें । हें आंधरें चांदिणें ।
मा चंद्रासि उणें । स्फुरतें का ? ॥१७२॥

म्हणोनि हें न व्हावे । ऐसेंही करूं पावे ।
तरी तैसाचि स्वभावें । आयिता असे ॥१७३॥

द्रष्टा दृश्य ऐसें । अळुमाळु दोनी दिसे ।
तेंही परस्परानुप्रवेशें । कांहीं ना कीं ॥१७४॥

तेथें दृश्य द्रष्टां भरे । । द्रष्टेपण दृश्यीं न सरे ।
मा दोन्ही न होनि उरे । दोहींचें साच ॥१७५॥

मग भलतेथ भलतेव्हां । माझारीले दृश्य-द्रष्टाभावा ।
आटणी करीत खेंवा । येती दोन्ही ॥१७६॥

कापुरीं अग्निप्रवेशु । कीं अग्नि घातला पोतासु ।
ऐसें नव्हे संसरिसु । वेंचु जाला ॥१७७॥

येका येकु वेंचला । शून्य बिंदु शून्यें पुसिला ।
द्रष्टा दृश्याचा निमाला । तैसें होय ॥१७८॥

किंबहुना आपुलिया । प्रतिबिंबा झोंबिनलिया ।
झोंबीसकट आटोनियां । जाईजे जेवीं ॥१७९॥

तैसें रुसता दृष्टी । द्रष्टा दृश्य भेटी ।
येती तेथें मिठी । दोहींची पडे ॥१८०॥

सिंधु पूर्वापर । न मिळती तंवचि सागर ।
मग येकवट नीर । जैसें होय ॥१८१॥

बहुये हें त्रिपुटी । सहजें होतया राहटी ।
प्रतिक्षणीं काय ठी । करीतसे ? ॥१८२॥

दोनी विशेषें गिळी । ना निर्विशिष्टातें उगळी ।
उघडीझांपी येकेंच डोळीं । वस्तुचि हे ॥१८३॥

पातया पातें मिळे । कीं दृष्ट्त्वें सैंघ पघळे ।
तिये उन्मळितां मावळे । नवलावो हा ॥१८४॥

द्रष्टा दृश्याचा ग्रासी । मध्यें लेखु विकासी ।
योगभूमिका ऐसी । अंगीं वाजे ॥१८५॥

उठिला तरंगु बैसे । पुढें आनुही नुमसे ।
ऐसा ठाईं जैसे । पाणी होय ॥१८६॥

कां नीद सरोनि गेली । जागृती नाहीं चेयिली ।
तेव्हां होय आपुली । जैसी स्थिति ॥१८७॥

नाना येका ठाऊनि उठी । अन्यत्र नव्हे पैठी ।
हे गमे तैशिया दृष्टी । दिठी सुतां ॥१८८॥

कां मावळो सरला दिवो । रात्रीचा न करी प्रसवो ।
तेणें गगनें हा भावो । वाखाणिला ॥१८९॥

घेतला स्वासु बुडाला । घापता नाहीं उठिला ।
तैसा दोहींसि सिवतला । नव्हे जो अर्थु ॥१९०॥

कीं अवघांचि करणीं । विषयांची घेणी ।
करितांचि येके क्षणीं । जें कीं आहे ॥१९१॥

तयासारिखा ठावो । हा निकराचा आत्मभावो ।
येणें कां पाहों । न पाहों लाभे ? ॥१९२॥

कायी आपुलिये भूमिके । आरिसा आपुलें निकें ।
पाहों न पाहों शके । हें कें आहे ? ॥१९३॥

कां समोर पाठिमोरिया । मुखें होऊं ये आरिसिया ।
वांचूनि तयाप्रति तया । होआवें कां ? ॥१९४॥

सर्वांगें देखणा रवी । परी ऐसें घडे कवीं ।
जे उदोअस्तूंचीं चवी । स्वयें घेपे ? ॥१९५॥

कीं रसु आपणिया पिये ? । कीं तोंड लपऊनि ठाये ? ।
हें रसपणें नव्हे । तया जैसें ॥१९६॥

तैसें पाहणें न पाहणें । पाहणेंपणेंचि हा नेणे ।
आणि दोन्ही हें येणें । स्वयेंचि असिजे ॥१९७॥

जें पाहणेंचि म्हणौनियां । पाहणें नव्हे आपणयां ।
तैं न पाहणें आपसया । हाचि आहे ॥१९८॥

आणि न पाहणें मा कैसें । आपणपें पाहों बैसे ? ।
तरी पाहणें हें ऐसें । हाचि पुढती ॥१९९॥

हीं दोन्ही परस्परें । नांदती एका हारें ।
बांधोनि येरयेरें । नाहीं केलें ॥२००॥

पाहाणया पाहणें आहे । तरी न पाहणें हेंचि नोहे ।
म्हणौनि याची सोये । नेणती दोन्ही ॥२०१॥

एवं पाहणें न पाहणें । चोरूनियां असणें ।
ना पाहे तरी कोणें । काय पाहिलें ? ॥२०२॥

दिसत्यानें दृश्य भासे । म्हणावें ना देखिलें ऐसें ।
तरी दृश्यास्तव दिसे । ऐसें नाहीं ॥२०३॥

दृश्य कीर दृष्टीसी दिसे । परी साच कीं द्रष्टा असे ।
आतां नाहीं तें कैसें । देखिलें होये ? ॥२०४॥

मुख दिसो कां दर्पणीं । परी असणें कीं तये मुखपणीं ।
तरी जाली ते वायाणी । प्रतीति कीं ॥२०५॥

देखतांची आपणयातें । आलिये निदेचेनि हातें ।
तया स्वप्ना ऐसा येथें । निह्याळितां ॥२०६॥

निद्रिस्तु सुखासनीं । वाहिजे आनु वाहणीं ।
तो साच काय तेसणी । दशा पावे ? ॥२०७॥

कीं सिसेंवीण येक येकें । दाविलीं राज्य करिती रंकें ।
तैसींचि तियें सतुकें । आथी काई ? ॥२०८॥

ते निद्रा जेव्हां नाहीं । तेव्हां जो जैसा जिये ठाई ।
तैसाची स्वप्नी कांहीं । न पविजेचि कीं ॥२०९॥

तान्हेलया मृगतृष्णा । न भेटलेया शिणु जेसणा ।
मा भेटलेया कोणा । काय भेटलें ॥२१०॥

कीं साउलीचेनि व्याजें । मेळविलें जेणें दुजे ।
तयाचें करणें वांझें । जालें जैसें ॥७-२११॥

तैसें दृश्य करूनियां । द्रष्ट्यातें द्रष्ट्या ।
दाऊनि धाडिलें वाया । दाविलेपणही ॥२१२॥

जें दृश्य द्रष्टाचि आहे । मा दावणें कां साहे ? ।
न दाविजे तरी नोहे । तया तो काई ? ॥२१३॥

आरिसा पां न पाहे । तरी मुखचि वाया जाये ? ।
तेणेंवीण आहे । आपणपें कीं ॥२१४॥

तैसें आत्मयातें आत्मया । न दाविजे पैं माया ।
तरी आत्मा वावो कीं वायां । तेचि कीं ना ? ॥२१५॥

म्हणोनि आपणापें द्रष्टा । न करितां असे पैठां ।
आतां जालाचि दिठा । कां न करावा ॥२१६॥

नाना मागुतें दाविलें । तरी पुनरुक्त जालें ।
येणेंहि बोलें गेलें । दावणें वृथा ॥२१७॥

दोरासर्पाभासा । साचपणें दोरु कां जैसा ।
द्रष्टा दृश्या तैसा । द्रष्टा साचु ॥२१८॥

दर्पणें आणि मुखें । मुख दिसे हें न चुके ।
परी मुखीं मुख सतुकें । दर्पणीं नाहीं ॥२१९॥

तैसे द्रष्टा दृश्या दोहों । साच कीं देखता ठावो ।
म्हणौनि दृश्य तें वावो । देखिलें जऱ्ही ॥२२०॥

वावो कीर होये । तऱ्ही दिसत तंव आहे ।
येणें बोलें होये । आथी ऐसें ॥२२१॥

तरी आन आनातें । देखोन होय देखतें ।
तरी मानूं येतें देखिलें ऐसें ॥२२२॥

येथें देखोनि कां न देखोनि । ऐक्य कां नाना होऊनि ।
परि हा येणेंवाचूनि । देखणें असे ? ॥२२३॥

आरिशानें हो कां दाविलें । तरी मुखचि मुखें देखिलें ।
तो न दावी तरी संचलें । मुखचि मुखीं ॥२२४॥

तैसें दाविलें नाहीं । तरी हाचि ययाचा ठाईं ।
ना दाविला तरीही । हाचि यया ॥२२५॥

जागृती दाविला । कां निद्रा हारविला ।
परी जैसा येकला । पुरुषपुरुषीं ॥२२६॥

कां रायातें तूं रावो । ऐसा दाविजे प्रत्ययो ।
तऱ्ही ठायें ठावो । राजाचि असे ॥२२७॥

ना तरी रायपण राया । नाणिजे कीं प्रत्यया ।
तऱ्ही कांहीं उणें तया । माजी असे ? ॥२२८॥

तैसें दावितां न दावितां । हा ययापरौता ।
चढे न तुटे आईता । असतचि असे ॥२२९॥

तरी कां निमित्य पिसें । हा यया दाऊं बैसें ।
देखतें नाहीं तैं आरिसे । देखावे कोणें ? ॥२३०॥

दीपु दावी तयातें रची । कीं तेणेंची सिद्धि दीपाची ।
तैसी सत्ता निमित्ताची । येणें साच ॥२३१॥

वन्हीतें वन्हीशिखा । प्रकाशी कीर देखा ।
परी वन्ही न होनि लेखा । येईल काई ? ॥२३२॥

आणि निमित्त जें बोलावें । तें येणें दिसोनि दावावें ।
देखिलें तरी स्वभावें । दृश्यही हा ॥२३३॥

म्हणौनि स्वयंप्रकाशा यया । आपणापें देखावया ।
निमित्त हा वांचुनियां । नाहींच मा ॥२३४॥

भलतेन विन्यासें । दिसत तेणेंची दिसे ।
हा वांचून नसे । येथें कांहीं ॥२३५॥

लेणें आणि भांगारें । भांगारचि येक स्फुरे ।
कां जे येथें दुसरें । नाहींचि म्हणोनि ॥२३६॥

जळ तरंगीं दोहीं । जळावांचूनि नाहीं ।
म्हणौनि आन कांहीं । नाहीं ना नोहे ॥२३७॥

हो कां घ्राणानुमेयो । येवो कां हातीं घेवो ।
लाभो कां दिठी पाहों । भलतैसा ॥२३८॥

परी कापुराच्या ठाईं । कापुरावांचूनि नाहीं ।
तैशा रीती भलतयाही । हाचि यया ॥२३९॥

आतां दृश्यपणें दिसो । कीं द्रष्टा होऊनि असो ।
परी हां वांचूनि अतिसो । नाहीं येथें ॥२४०॥

गंगा गंगापणें वाहो । कीं सिंधु होऊनि राहो ।
परी पाणीपणा नवलाहो । हें न देखो कीं ॥२४१॥

थिजावें कीं विघरावें । हें अप्रयोजक आघवें ।
घृतपण नव्हे । अनारिसें ॥२४२॥

ज्वाळा आणि वन्हि । न लेखिजती दोन्ही ।
वन्हिमात्र म्हणोनि । आन नव्हेचि कीं ॥२४३॥

तैसें द्रश्य कां द्रष्टा । या दोन्ही दशा वांझटा ।
पाहतां येकी काष्ठा । स्फूर्तिमात्र तो ॥२४४॥

इये स्फूर्तीकडुनी । नाहीं स्फुर्तिमात्रवांचुनि ।
तरी काय देखोनि । देखतु असे ? ॥२४५॥

पुढें फरकें ना दिसतें । ना मगें डोकावी देखतें ।
पाहतां येणें ययातें । स्फुरद्रुपेंचि ॥२४६॥

कल्लोळें जळीं घातलें । सोनेंनि सोनें पांघुरलें ।
दिठीचे पाय गुंतले । दिठीसीचि ॥२४७॥

श्रुतीसि मेळविली श्रुती । द्दतीसि मेळविली द्दती ।
कां जे तृप्तीसीचि तृप्ति । वेगारिली ॥२४८॥

गुळें गुळ परवडिला । मेरु सुवर्णें मढिला ।
कां ज्वाळा गुंडाळिला । अनळु जैसा ॥२४९॥

हें बहु काय बोलिजे । कीं नभ नभाचिया रिगे सेजे ।
मग कोणें निदिजे । मग जागे तें कोणें ॥२५०॥

हा येणें पाहिला आइसा । कांहीं न पाहिला जैसा ।
आणि न पाहतांहि अपैसा । पाहणेंचि हा ॥२५१॥

येथें बोलणें न साहे । जाणणें न समाये ।
अनुभऊ न लाहे । अंग मिरौ ॥२५२॥

म्हणोन ययातें येणें । ये परीचें पाहणें ।
पाहतां कांहीं कोणे । पाहिलें नाहीं ॥२५३॥

किंबहुना ऐसें । आत्मेनि आत्मा प्रकाशे ।
न चेतुचि चेऊं बैसे । जयासि तो ॥२५४॥

स्वयें दर्शनाचिया सवा । अवघियाची जात फावां ।
परी निजात्मभावा । न मोडिताही ॥२५५॥

न पाहतां आरिसा असो पाहे । तरी तेंचि पाहणें होये ।
आणि पाहणेन तरी जाये । न पाहणें पाहणें ॥२५६॥

भलतैसा फांके । परी येकपणा न मुके ।
नाना संकोचे तरी असकें । हाचि आथी ॥२५७॥

सूर्याचिया हाता । अंधकारू नये सर्वथा ।
मा प्रकाशाची कथा । आईकता का ? ॥२५८॥

अंधारु कां उजिवडु । हा एकला येकवडु ।
जैसा कां मार्तंडु । भलतेथें ॥२५९॥

तैसा आवडतिये भूमिके । आरूढलियाही कौतुकें ।
परि ययातें हा न चुके । हाचि ऐसा ॥२६०॥

सिंधूची सींव न मोडे । पाणीपणा सळु न पडे ।
जरी मोडूत गाडे । तरंगांचे ॥२६१॥

रश्मि सूर्यीच आथी । परी बिंबाबहेरी जाती ।
म्हणौनि बोधसंपत्ती । उपमा नोहे ॥२६२॥

आणि पळहेच दोडा । न पडतां तढा ।
जग तंव कापडा । न भरेचि कीं ॥२६३॥

सोनयाचा रवा । रवेपणाचा ठेवा ।
अवघेयाचि अवयवा । लेणें नोहे ॥२६४॥

न फेडितां आडवावो । दिगंतौनि दिगंता जावो ।
न ये मा पावों । उपमा काई ? ॥२६५॥

म्हणौनि इये आत्मलीळे । नाहीं आन कांटाळें ।
आतां ययाचिये तुळे । हाचि यया ॥२६६॥

स्वप्रकाशाचा घांसीं । जेवितां बहु वेगेंसी ।
वेंचेना परी कुसीं । वाखही न पडे ॥२६७॥

ऐसा निरुपमापरी । आपुलिये विलासवरी ।
आत्मा राणीव करी । आपुला ठाईं ॥२६८॥

तयातें म्हणिपें अज्ञान । तरी न्याया भरलें रान ।
आतां म्हणे तयाचें वचन । उपसावों आम्ही ॥२६९॥

प्रकाशितें अज्ञान । ऐसें म्हणणें हन ।
तरी निधि दावितें अंजन । न म्हणिजे काई ? ॥२७०॥

सुवर्णगौर अंबिका । न म्हणिजे कय काळिका ? ।
तैसा आत्मप्रकाशका । अज्ञानवादु ॥२७१॥

येऱ्हवीं शिवोनि पृथ्वीवरि । तत्त्वांच्या वाणेपरी ।
जयाचा रश्मिकरीं । उजाळा येती ॥२७२॥

जेणें ज्ञान सज्ञान होये । दृङ्मात्र दृष्टीतें विये ।
प्रकाशाचा दिवो पाहे । प्रकाशासी ॥२७३॥

तें कोणें निकृष्टें । दाविलें अज्ञानाचेनि बोटें ।
ना तमें सूर्य मोटे । बांधतां निकें ॥२७४॥

`अ` पूर्वी ज्ञानाक्षरी । वसतां ज्ञानाची थोरी ।
शब्दार्थाची उजरी । अपूर्व नव्हे कीं ? ॥२७५॥

लाखेचे मांदुसे । आगीचें ठेवणें कायिसें ? ।
आंतु बाहेरी सरिसें । करून घाली ॥२७६॥

म्हणोनि जग ज्ञानें स्फितें । बोलतां अज्ञानवादातें ।
विखुरली होती आतें । वाचेचिये ॥२७७॥

आखरीं तंव गोवधु । पुधारां अनृतवादु ।
मा कैसा अज्ञानवादु । कीजे ज्ञानीं ? ॥२७८॥

आणि अज्ञान म्हणणें । स्फुरत्से अर्थपणें ।
आतां हेंचि ज्ञान कोणे । मानिजे ना ? ॥२७९॥

असो हें आत्मराजें । आपणापें जेणें तेजें ।
आपणचि देखिजे । बहुये परी ॥२८०॥

निर्वचितां जें झावळे । तेंचि कीं लाहे डोळे ? ।
डोळ्यापुढें मिळे । तेंचि तया ॥२८१॥

ऐसें जगज्ञान जें आहे । तें अज्ञान म्हणें मी वियें ।
येणें अनुमानें हों पाहे । आथी ऐसें ॥२८२॥

तंव अज्ञान त्रिशुद्धि नाहीं । हें जगेंचि ठेविलें ठाई ।
जे धर्मधर्मित्वें कंहीं । ज्ञानाज्ञान असे ? ॥२८३॥

कां जळां मोतीं वियें ? । राखोंडिया दीपु जिये ? ।
तरी ज्ञानधर्मु होये । अज्ञानाचा ॥२८४॥

चंद्रमा निगती ज्वळा ? । आकाश आते शिळा ? ।
तरी अज्ञान उजळा । ज्ञानातें वमी ॥२८५॥

क्षीराब्धीं काळकूट । हे एकी परीचे विकट ।
परी काळकूटीं चोखट । सुधा कैंची ? ॥२८६॥

ना ज्ञानी अज्ञान जालें । तें होतांचि अज्ञान गेलें ।
पुढती ज्ञान येकलें । अज्ञान नाहीं ॥२८७॥

म्हणौनि सूर्य सूर्याचि येवढा । चंद्र चंद्राचि सांगडा ।
ना दिपाचिया पडिपाडा । ऐसा दीपु ॥२८८॥

प्रकाश तो प्रकाश कीं । यासि न वचे घेईं चुकी ।
म्हणौनि जग असकी । वस्तुप्रभा ॥२८९॥

विभाति यस्य भासा । सर्वमिदं हा ऐसा ।
श्रुति काय वायसा । ढेंकरू देती ॥२९०॥

यालागीं वस्तुप्रभा । वस्तुचि पावे शोभा ।
जात असे लाभा । वस्तुचिया ॥२९१॥

वांचून वस्तु यया । आपणपें प्रकाशावया ।
अज्ञान हेतु वांया । अवघेंचि ॥२९२॥

म्हणोनि अज्ञान सद्भावो । कोण्हे परी न लाहों ।
अज्ञान कीर वावो । पाहों ठेलियाही ॥२९३॥

परी तमाचा विसुरा । न जोडेचि दिनकरा ।
रात्रीचिया घरा । गेलियाही ॥२९४॥

कां नीद खोळे भरिता । जागणें ही न ये हाता ।
येकलिया टळटळिता । ठाकिजे जेवीं ॥२९५॥
॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदमृतानुभवे अज्ञानखंडन नाम सप्तम प्रकरणं संपूर्णम्॥

# ज्ञानखंडन

तैसें आमुचेनि नावें । अज्ञानाचें ज्ञानही नव्हे ।
आम्हालागीं गुरुदेवें । आम्हीच केलों ॥१॥

परी आम्हा आम्ही आहों । तें कैसें पाहो जावों ।
तंव काय कीजे ठावो । लाजिजे ऐसा ॥२॥

हा ठावोवरी गुरुरायें । नांदविलों उवायें ।
जे आम्ही न समाये । आम्हांमाजीं ॥३॥

अहो आत्मेपणीं न संटो । स्वसंविति न घसवटो ।
आंगीं लागलिया न फुटों । कैवल्यही ॥४॥

आमुची करवे न गोठी । ते जालीचि नाहीं वाक्सृष्टी ।
आमुते देखे दिठी । ते दिठीचि नव्हे ॥५॥

आमुतें करूनि विखो । भोगूं शके पारखो
तैं आमुतें न देखों । आम्हीपण ॥६॥

प्रगटो लपो न लाहो । येथें नाहीं नवलवो ॥७॥
परी कैसेनिही विपावो । असणयाचा ।

किंबहुना श्रीनिवृत्तीं । ठेविलों असों जया स्थितीं ।
ते काय देऊं हाती । वाचेचिया ? ॥८॥

तेथ समोर होआवया । अज्ञानाचा पाडु कासया ।
केउते मेलिया माया । होऊं पाहिजे ! ॥९॥

अज्ञानाचा प्रवर्तु । नाहीं जया गांवाआंतु ।
तेथें ज्ञानाची तरी मातु । कोण जाणे ? ॥१०॥

राती म्हणोनि दिवे । पडती कीं लावावे ।
वांचून सूर्यासवें । शिणणें होय ॥११॥

म्हणोन अज्ञान नाहीं । तेथेंचि गेलें ज्ञानही ।
आता निमिषोन्मेषा दोहीं । ठेली वाट ॥१२॥

येऱ्हवी तऱ्ही ज्ञान अज्ञानें । दोहींचि अभिधानें ।
अर्थाचेनि आनानें । विप्लावलीं ॥१३॥

जैंसी दंपत्यें परस्परे । तोडोनि पालटलीं शिरें ।
तेथें पालटु ना पण सरे । दोहींचे जिणें ॥१४॥

कां पाठी लाविला होये । तो दिपुचि वायां जाये ।
दिठी अंधारें पाहे । तैं तेचि वृथा ॥१५॥

तैसें निपटून जें नेणिजे । तें अज्ञान शब्दें बोलिजे ।
आता सर्वही जेणें सुजे । तें अज्ञान कैसें ? ॥१६॥

ऐसें ज्ञान अज्ञानीं आलें । अज्ञान ज्ञानें गेलें ।
ये दोही वांझौलें । दोन्ही जाली ॥१७॥

आणि जाणे तोचि नेणे । नेणे तोचि जाणे ।
आतां कें असे जिणें । ज्ञानाज्ञाना ? ॥१८॥

एवं ज्ञानाज्ञानें दोन्ही । पोटीं सूनि अहनी ।
उदैला चिद्गगनीं । चिदादित्यु हा ॥१९॥

॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्मृतानुभवे ज्ञानखंडन नाम अष्टम प्रकरणं संपूर्णम् ॥

# जीवन्मुक्तदशाकथन

आता आमोद सुनास जालें । श्रुतीसि श्रवण रिघाले ।
आरिसे उठले । लोचनेसी ॥१॥

आपुलेनि समीरपणें । वेल्हावती विंजणे ।
कीं माथेचि चांफेपणें । बहकताती ॥२॥

जिव्हा लोधली रसें । कमळ सूर्यपणें विकाशे ।
चकोरचि जैसे । चंद्रमा झाले ॥३॥

फुलेंचि जालीं भ्रमर । तरुणीची झाली नर ।
जालें आपुलें शेजार । निद्राळुचि ॥४॥

दिठिवियाचा रवा । नागरू इया ठेवा ।
घडिला कां कोरिवां । परी जैसा ॥५॥

चूतांकूर झाले कोकीळ । आंगच झाले मलयनीळ ।
रस झाले सकळ । रसनावंत ॥६॥

तैसें भोग्य आणि भोक्ता । दिसे आणि देखता ।
हें सरलें अद्वैता । अफुटामाजीं ॥७॥

सेवंतेपणा बाहेरी । न निगताचि परी ।
पाती सहस्रावरी । उपलविजे ते ॥८॥

तैसें नवा नवा अनुभवीं वाजतां वाधावी ।
अक्रियेच्या गांवीं । नेणिजे तें ॥९॥

म्हणोनि विषयांचेनि नांवें । सूनि इंद्रियांचे थवे ।
सैंघ घेती धांवे । समोरही ॥१०॥

परी आरिसा शिवे शिवे । तंव दिठीसी दिठी फावे ।
तैसे झाले धांवे । वृत्तीचे या ॥११॥

नाग मुदी कंकण । त्रिलिंगीं भेदली खूण ।
घेतां तरी सुवर्ण । घेईजे कीं ॥१२॥

वेंचूनि आंणू कल्लोळ । म्हणोन घापे करतळ ।
तेथें तरी निखळ । पाणीच फावे ॥१३॥

हातापाशीं स्पर्शु । डोळयापाशीं रूपसु ।
जिव्हेपाशीं मिठांशु । कोण्ही एकू ॥१४॥

तऱ्ही परिमळापरौतें । मिरवणें नाहीं कापुरातें ।
तेवीं बहुतांपरी स्फुरतें । तेंचि स्फुरे ॥१५॥

म्हणोनि शब्दादि पदार्थ । श्रोत्रादिकांचे हात ।
घ्यावया जेथ । उजू होती ॥१६॥

तेथ संबंधु होये न होये । तंव इंद्रियांचे तें नोहे ।
मग असतोंचि आहे । संबंधु ना ॥१७॥

जिये पेरीं दिसती उशीं । तिये लाभती कीं रसीं ।
कांति जेवीं शशीं । पुनवेंचिया ॥१८॥

पडिलें चांदावरी चांदिणें । समुद्रीं झाले वरिषणें ।
विषयां करणें । भेटती तैंशीं ॥१९॥

म्हणोन तोंडाआड पडे । तेंहि वाचा वावडे ।
परी समाधी न मोडे । मौनमुद्रेची ॥२०॥

व्यापाराचे गाडे । मोडतांहि अपाडे ।
अक्रियेचें न मोडे । पाऊल केंही ॥२१॥

पसरूनि वृत्तीची वावे । दिठी रूपातें दे खेवें ।
परी साचाचेनि नांवे । कांहींचि न लभे ॥२२॥

तमातें घ्यावया । उचलूनी सहस्र बाहिया ।
शेवटीं रवी इया । हाचि जैसा ॥२३॥

स्वप्नींचिया विलासा । भेटईन या आशा ।
उठिला तंव जैसा । तोचि मा तो ॥२४॥

तैसा उदैलया निर्विषयें । ज्ञानी विषयी हों लाहे ? ।
तंव दोन्ही न होनी होये । काय नेणों ॥२५॥

चंद्र वेचूं गेला चांदिणें । तंव वेंचिलें काय कोणें ।
विऊनि वांझें स्मरणें । होतीं जैसी ॥२६॥

प्रत्याहारादि अंगीं । योगें आंग टेंकिलें योगीं ।
तो जाला इये मार्गी । दिहाचा चांदु ॥२७॥

येथ प्रवृत्ति बहुडे जिणें । अप्रवृत्तीसी वाधावणें ।
आतां प्रत्यङ्मुखपणें । प्रचारु दिसे ॥२८॥

द्वैतदशेचें आंगण । अद्वैत वोळगे आपण ।
भेद तंव तंव दुण । अभेदासी ॥२९॥

कैवल्याचा चढावा । करीत विषयसेवा ।
झाला भृत्य भज्य कालोवा । भक्तीच्या घरीं ॥३०॥

घरामाजीं पायें । चालतां मार्गुही तोचि होये ।
ना बैसे तरी आहे । पावणेंचि ॥३१॥

तैसें भलतें करितां । येथें पाविजे कांहीं आतां ।
ऐसें नाहीं न करितां । ठाकिजेना ॥३२॥

आठवु आणि विसरु । तयातेंही घेऊं नेदी पसरु ।
दशेचा वेव्हारु । असाधारणु ॥३३॥

झाला स्वेच्छाचि विधि । स्वैर झाला समाधि ।
दशे ये मोक्षऋद्धि । बैसों घापे ॥३४॥

झाला देवोचि भक्तु । ठावोचि झाला पंथु ।
होऊनि ठेला एकांतु । विश्वचि हें ॥३५॥

भलतेउनि देवें । भलतेन भक्त होआवें ।
बैसला तेथें राणिवें । अकर्मु हा ॥३६॥

देवाचिया दाटणी । देऊळा झाली आटणी ।
देशकाळादि वाहाणीं । येईच ना ॥३७॥

देवीं देवोचि न माये | मा देवी कें अन्वयो आहे ? ।
येथ परिवारु बहूये । अघडता कीं ॥३८॥

ऐसियाहि स्वामीभृत्यसंबंधा । लागीं उठलीं श्रद्धा ।
तैं देवोचि नुसधा । कामविजे ॥३९॥

अवघिया उपचारा । जपध्यान निर्धारा ।
नाहीं आन संसारा । देवोवांचुनी ॥४०॥

आतां देवातेंचि देवें । देववरी भजावें ।
अर्पणाचेनि नांवें । भलतिया ॥४१॥

पाहें पां आघवया । रुखा रुखचि यया ।
परी दुसरा नाहीं तया । विस्तार जेवीं ॥४२॥

देव देऊळ परिवारु । कीजे कोरुनि डोंगरु ।
तैसा भक्तीचा व्यवहारु । कां न व्हावा ? ॥४३॥

अओ मुगीं मुग जैसें । घेतां न घेतां नवल नसे ।
केलें देवपण तैसें । दोहीं परी ॥४४॥

अखतांचि देवता । अखतींचि असे न पूजितां ।
मा अखतीं काय आतां । पुजो जावी ॥४५॥

दीप्तीचीं लुगडीं । दीपकळिके तूं वेढी ।
हें न म्हणतां ते उघडी । ठाके काई ? ॥४६॥

कां चंद्रातें चंद्रिका । न म्हणिजे तूं लेकां ।
तऱ्ही तो असिका । तियाचि कीं ना ॥४७॥

आगीपण आगी । असतचि असे अंगीं ।
मा कासयालागीं । देणें न देणें ? ॥४८॥

म्हणोनि भजतां भजावें । मा न भजतां कय नव्हे ? ।
ऐसें नाहीं स्वभावें । श्रीशिवुचि असे ॥४९॥

अतां भक्ति अभक्ति । झालें ताट एके पातीं ।
कर्माकर्मांचिया वाती । काल्हावूनियां ॥५०॥

म्हणोनि उपनिषदें । दशे येति निंदे ।
निंदाचि विशदें । स्तोत्रें होती ॥५१॥

ना तरी निंदास्तुति । दोन्हीं मौनासाठीं जाती ।
मौनीं मौन आथी । न बोलतां बोली ॥५२॥

घालिता अव्हासव्हा पाय । शिवयात्राचि होतु जाय ।
शिवा गेलियाही नोहे । कैंही जाणें ॥५३॥

चालणें आणि बैसक । दोन्ही मिळोनि एक ।
नोहे ऐसें कौतुक । इये ठायीं ॥५४॥

येऱ्हवीं आडोळलिया डोळा । शिवदर्शनाचा सोहळा ।
भोगिजे भलते वेळां । भलतेणें ॥५५॥

ना समोर दिसे शिवुही । परि देखिलें कांहीं नाहीं ।
देवभक्ता दोही । एकुचि पाड़ ॥५६॥

आपणचि चेंडू सुटे । मग आपणया उपटे ।
तेणें उदळतां दाटे । आपणपांचि ॥५७॥

ऐसी जरी चेंडूफळी । देखिजे कां केव्हेळीं ।
तरी बोलिजे हे सरळी । प्रबुद्धाची ॥५८॥

कर्माचा हातु नलगे । ज्ञानाचेंही कांहीं न रिगे ।
ऐसीचि होतसे आंगें । उपास्ति हे ॥५९॥

निफजे ना निमे । आंगें आंग घुमे ।
सुखा सुख उपमे । देववेल यया ॥६०॥

कोण्ही एक अकृत्रीम । भक्तीचें हें वर्म ।
योगज्ञानादिविश्राम । भूमिके हे ॥६१॥

आंगें कीर एक झालें । परी नामरूपाचे मासले ।
होते तेही आटले । हरिहर येथें ॥६२॥

अहो अर्धनारीनटेश्वरें । गिळित गिळित परस्परें ।
ग्रहण झालें एकसरें । सर्वग्रासें ॥६३॥

वाच्यजात खाऊनी । वाचकत्वहि पिऊनी ।
टाकली निदैजोनी । परा येथें ॥६४॥

शिवाशिवा ! समर्था स्वामी । येवढीये आनंदभूमि ।
घेपे दीजे एकें आम्हीं । ऐसें केलें ॥६५॥

चेतचि मा चेवविलें । निदैलेंचि मा निदविलें ।
आम्हीचि आम्हा आणिलें । नवल जी तुझें ॥६६॥

आम्ही निखळ मा तुझे । वरी लोभें म्हणसी माझें ।
हें पुनरुक्त साजे । तूंचि म्हणोनी ॥६७॥

कोणाचें कांहीं न घेसी । आपुलेंही तैसेंचि न देसी ।
कोण जाणे भोगिसी । गौरव कैसें ॥६८॥

गुरुत्वें जेवढा चांगु । तेवढाचि तारूनि लघु ।
गुरु लघु जाणे जो पांगु । तुझा करी ॥६९॥

शिष्यां देतां वाटे । अद्वैताचा समो फुटे ।
तरी काह्या होती भाटें । शास्त्रें तुझीं ॥७०॥

किंबहुना ये दातारा । तूं याचा संसारा ।
वेंचोनि होसी सोयरा । तेणेंचि तोषें ॥७१॥

॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्मृतानुभवे जीवन्मुक्तदशाकथनं नाम नवमं प्रकरणं संपूर्णम् ॥

# ग्रंथपरिहार

परी गा निवृत्तिराया । हातातळीं सुखविलें तूं या ।
तरी निवांतचि मियां । भोगावें कीं तें ॥१॥

परी महेशें सूर्याहातीं । दिधली तेजाची सुती ।
तया भासा अंतर्वर्ती । जगचि केलें ॥२॥

चंद्रासि अमृत घातलें । तें तयाचि कायि येतुलें ।
कीं सिंधु मेघा दिधले । मेघाचि भागु ॥३॥

दिवा जो उजेडु । तो घराचाचि सुरवाडू ।
गगनी आथी पवाडु । तो जगाचाचि कीं ॥४॥

अगाधेंहि उचंबळती । तें चंद्रीचि ना शक्ती ? ।
वसंतु करी तैं होती । झाडांचें दानीं ॥५॥

म्हणोनि हें असंवर्य । दैविकीचें औदार्य ।
वांचोनि स्वातंतर्य । माझें नाहीं ॥६॥

आणि हा येवढा ऐसा । परिहारू देवू कायसा ।
प्रभुप्रभावविन्यासा । आड ठावूनी ॥७॥

आम्ही बोलिलों जें कांहीं । तें प्रकटचि असे ठायीं ।
मा स्वयंप्रकाशा काई । प्रकाशावें बोलें ? ॥८॥

नाना विपायें आम्हीं हन । कीजे तें पां मौन ।
तरी काय जनी जन दिसतें ना ? ॥९॥

जनातें जनीं देखतां । द्रष्टेंचि दृश्य तत्वतां ।
कोण्ही नहोनि आइता । सिध्दांत हा ॥१०॥

ययापरौतें काहीं । संविद्रहस्य नाहीं ।
आणि हे तया आधींही । असतचि असे ॥११॥

तऱ्ही ग्रंथप्रस्तावो । न घडे हें म्हणों पावो ।
तऱ्ही सिध्दानुवाद लाहों । आवडी करूं ॥१२॥

पढियंते सदा तेंचि । परी भोगीं नवी नवी रुची ।
म्हणोनि ह उचितुचि अनुवाद सिध्द ॥१३॥

या कारणें मियां । गौप्य दाविलें बोलुनियां ।
ऐसें नाहीं, आपसया । प्रकाशुचि ॥१४॥

आणि पूर्ण अहंता वेठलों । सैंघ आम्हीच दाटलों ।
मा लोपलों ना प्रगटलों । कोणा होऊनी ॥१५॥

आपणया आपणपें । निरूपण काय ओपे ? ।
मा उगेपणे हरपे । ऐसे आहे ? ॥१६॥

म्हणोनि माझी वैखरी । मौनाचेंहि मौन करी ।
हे पाणियावरी मकरी । रेखिली पां ॥१७॥

एवं दशोपनिषदें । पुढारी न ढळती पदें ।
देखोनि बुडी बोधें । येथेंचि दिधली ॥१८॥

ज्नानदेवो म्हणे श्रीमंत । हें अनुभवामृत ।
सेंवोनि जीवन्मुक्त । हेंचि होतु ॥१९॥

मुक्ति कीर वेल्हाळ । अनुभवामृत निखळ ।
परी अमृताही उठी लाळ । अमृतें येणे ॥२०॥

नित्य चांदु होये । परी पुनवे आनु आहे ।
हें कां मी म्हणों लाहें । सूर्यदृष्टी ? ॥२१॥

प्रिया सावायिली होये । तै अंगीचे अंगीं न समाये ।
येऱ्हवीं तेथेंचि आहे । तारुण्य कीं ॥२२॥

वसंताचा आला । फळीं फुलीं आपला ।
गगनाचिया डाळा । पेलती झाडें ॥२३॥

ययालागीं हें बोलणें । अनुभामृतपणें ।
स्वानुभूति परगुणें । वोगरिलें ॥२४॥

आणि मुक्त मुमुक्षु बद्ध । हें तंववरी योग्यता भेद ।
अनुभामृतस्वाद । विरुद्ध जंव ॥२५॥

गंगावगाहना आली । पाणीयें गंगा झालीं ।
कां तिमिरें भेटलीं । सूर्या जैशीं ॥२६॥

नाहीं परिसाची कसवटी । तंववरीच वानियाच्या गोठी ।
मग पंधरावयाच्या पटीं । बैसावें कीं ॥२७॥

तैसें जे या अखरा । भेटती गाभारां ।
ते वोघ जैसे सागरा । आंतु आले ॥२८॥

जैशा आकारादि अक्षरा । भेटती पन्नासही मात्रा ।
तैसें या चराचरा । दुसरें नाहीं ॥२९॥

तैसी तये ईश्वरीं । अंगुळी नव्हेचि दुसरी ।
किंबहुना सरोभरीं शिवेसीचि ॥३०॥

म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृतें येणें ।
सणु भोगिजे सणें विश्वाचेनि ॥३१॥

॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमद्अमृतानुभवे ग्रंथपरिहारकथनं नाम दशमं प्रकरणं संपूर्णम् ॥

hemantpm